# ढोल

आदिवासी चेतनेचे नियतकालिक

अहिराणी आवृत्तीचे संपादक : डॉ. सुधीर देवरे

bhasha publications

भाषा संशोधन-प्रकाशन केंद्र

**ढोल : आदिवासी चेतनेचे नियतकालिक**
**अहिराणी : अंक ५ : जानेवारी २००४**

प्रकाशक
**भाषा संशोधन-प्रकाशन केंद्र**
६, युनायटेड अॅव्हेन्यू, दिनेश मिलजवळ
वडोदरा- ३९० ००७

मुद्रक
**आकार ऑफसेट**
दांडीया बाजार, वडोदरा- ३९० ००१

मुखपृष्ठ छायाचित्र
**शशिकांत कापडणीस**

रेखांकने
**राजेंद्र देसले**

मूल्य
**प्रति अंकी रु. १५/-**

संपर्क
**भाषा संशोधन-प्रकाशन केंद्र**, ६ युनायटेड अॅव्हेन्यू, दिनेश मिलजवळ, वडोदरा- ३९० ००७, गुजरात.
**डॉ. सुधीर देवरे**, टेलिफोन कॉलनी, बस स्थानकामागे, सटाणा-४२३ ३०१, जि. नाशिक, महाराष्ट्र.

# अनुक्रमणिका

# अहिराणी लेखकरन्नी सूची

| | |
|---|---|
| १. कै. बहिनाबाई चौधरी | : बहिनाबाईच्या कविता |
| २. कै. दा. गो. बोरसे | : जिभाऊ, अहिराणीची कुळकथा, खान्देश वाग्वैभव, लोकनाट्य, गिरजा, तापीतरंग, अजिंठ्याचे लेणे आशा त्यास्ना पुस्तकं प्रकाशित शेतंस. (माध्यम : मराठी) |
| ३. कै. राजा महाजन | : अहिराणीवर आणि अहिराणीमा काही लिखान सूर्यानी लेख आणि गुन्हेगार, (कथा संग्रह) |
| ४. सदाशिव माळी | : दोन संकलनं (माध्यम : मराठी) |
| ५. कृष्णा पाटील | : अहिराणी लोक साहित्य दर्शन भाग-१, (माध्यम : मराठी)<br>अहिराणी लोक साहित्य दर्शन भाग-२, (माध्यम : मराठी) |
| ६. रमेश सूर्यवंशी | : अहिराणी म्हणी - वाक्‌प्रचार (संकलन माध्यम : मराठी)<br>अहिराणी शब्दकोश, (Dictionary)<br>अहिराणी भाषा वैज्ञानिक अभ्यास (माध्यम : मराठी) |
| ७. बापूराव देसाई | : 'आक्खी हयाती' (कादंबरी)<br>खानदेशी साहित्य सुरभि (संकलन)<br>बणी कारे बापू (संकलन) |
| ८. सुधीर देवरे | : 'आदिम तालनं संगीत' (अहिराणी कवितासंग्रह)<br>'अहिराणी लोकपरंपरा' (अहिराणी लेखसंग्रह)<br>'अहिराणी कथालेखन'<br>हिन्दी, इंग्रजी, मराठी लेखस्ना अहिराणी भाशामा अनुवाद.<br>अहिराणी 'ढोल' न संपादन आनि अहिराणी माध्यममा सदर, ललित, निबंध आनि बाकीनं लेखन सुरु. |
| ९. कै. विजया श्रीधर चिटणीस | : 'खानदेशी बोली' (धुळे जिल्हामजारला 'मोहाडी' ह्या गावनी भाशाना अभ्यास पुणा विद्यापीठनी पीएचडी कर्ता सादर-१९६४, माध्यम इंग्रजी) |

(अहिराणी लेखकंस्नी हायी सुची आपूरी व्हयी. ज्या अहिराणी लेखकंस्ना ह्या सूचीमा उल्लेख नही त्यास्नी 'ढोल' शी संपर्क करवा.)

# संपादकना दोन शब्द

येकदम दोन वरीसना इसावा घीसन आज अहिराणी 'ढोल' ना पाचवा अंक प्रकाशित व्हयी ऱ्हायना. यानं कारन गुजरातनी दंगलनी आपला पाचवा अंक खायी घिदा. म्हनजे ह्या अंकमजारला सगळा मजकूर 'ढोल'ना सहावा अंकमा ऱ्हाता, ते आता पाचवा अंकमा यी ऱ्हायना. पाचवा अंकमजारलं बरचंसं साहित्य यानं मोऱ्हेबी कदाचित उजेडात येनार नहीच, कारन त्या साहित्यन्या स्थळ प्रती नव्हत्यात. साहित्य दवडाना दुखमुळे पुढला अंककर्ता लिखान कराले आनि साहित्य गोळा कराले मन धजाये ना. ज्या लेखकस्नी, संग्राहकस्नी साहित्य उपलब्ध करी दिधं व्हंत, त्यास्ले आपलं साहित्य दवडी गयं, आशे कोनता तोंडवरी सांगवा आशे व्हयी गयं, पन 'वास्तव' गोट लपाडी लपाडी कैन्ह पावत लपई ? ज्या ज्या साहितिकस्न साहित्य दंगलमा दवडी गयं त्या सगळास्ना मी 'दिलगीर' शाउस. 'दिलगिरी' व्यक्त करामुळे हायी नुकसान भरासारखं नही यानी कल्पना माले शेच. हायी या वरीसनी 'ढोल' ना परिवारमजारली दुःखदायक घटना शे.

हायी घटनामातीनच दुसरी बाजुनंबी मी चिंतन कराले लागी गवू. गोळा करेल आनि लिहेल साहित्य दवडी जावामुळे मी जर इतका हात टेकी दिधात; ते हया गुजरातनी दंगल मा अनेक कर्ता सवर्ता लोकस्न आयुक्ष मजारच कापायी गयं, जळी गयं, त्यास्ना कुटुंब उघडा पडनात! त्यास्न काय? रोजी रोटी कमाडेत त्या दुकानंस्नी राख व्हयी गयी, ज्यास्ना हात-तोंड नी गाठ याळभर कष्ट करासाइ पडेना त्यास्न वाटोळं व्हयी गयं, ह्या सगळा लोकरनी काय करवा? कोन्ना तोंडंकडे पाव्हा? हायी दुख धरी बशीच ऱ्हावा का पुढला जीवनना रहाटगाडगाले शरन जावा?

घडेल घटना अपघात समजीसन सगळास्ले जीवन सातत्यले शरन जावासायी गत्यंतर नही, तशे 'ढोल' कर्ता साहित्य जुळवाजुळवनं काम आखो सुरु कयं. तोच हाऊ अंक.

दुःखमा सुख येवढंच ते ह्या अंकपशी 'ढोल'ना अहिराणी अंकले महाराष्ट्रना साहित्य संस्कृति मंडळनं अनुदान मिळी व्हायनं. ह्या अनुदान मुळे परत्येक सहा महिनाले म्हनजे वरीसमातीन दोन अंक यानं मोऱ्हे हमखास निघंतीनच. आज पावत 'ढोल' प्रकाशनना सगळा खर्च 'भाषा केन्द्र' करे आनि अंकना उद्देश सफल व्हवाले पाहिजे म्हनीसन अंकमां जाहिराती न देवामुळे 'ढोल' येळवर प्रकाशित करनं तशे खूप अवघड काम व्हतं. आता अंकना खर्चनी तोंडमिळवनी कराले ह्या अनुदानना हातभार लागयी.

परत्येक.अहिराणी भाशिक मानोसनी चेतना जागृत व्हवाले पाहिजे आशे काम 'ढोल' ना व्यासपीठवरथीन व्हयी ऱ्हायनं. अहिराणी भाशिक लेखकसकर्ता 'ढोल' ना पाठपुरावामुळे साहित्य अकादमी ना पुरस्कार अहिराणी भाशाले मिळना. मांगला वरीसले हाऊ पुरस्कार श्री. कृष्णा पाटील यास्ले मिळना.

अहिराणी 'ढोल' हायी राष्ट्रीय पातळीवरलं पहिलं अहिराणी नियतकालिक शे. लोकभाशा, आदिवासी

भाषा आनि लोकसंस्कृति जित्ता ठेवाना येक भाग म्हनीसन अस्सल अहिराणी माध्यममजारलं हायी नियतकालिक सुरु जयं. हया नियतकालिकमातून लोकभाशा, लोकवाङ्मय, लोकदैवतं, लोकजीवन, लोककला, लोकपरंपरा, लोकश्रध्दा यास्नं उपयोजन करेल ऱ्हास. आदिवासी लोकजीवन, आदिवासी कथा आनि त्यास्न्या कथा, आदिवासी संस्कृती यास्ना अभ्यासकर्ता अभ्यासकस्ले 'ढोल' वाचना पडयी. आदिवासी आनि भटका आदिवासी यास्ना जीवनमजारला वनवास जनता जनार्दनपावत दखाडाले घी जाना व्हयी आनि तो सरकार दरबारमाबी मांडना व्हयी, ते त्याकर्ता 'ढोल' पुढाकार घेस. हया सगळया गोष्टीस्ले 'ढोल' मा पुरेपुर जागा मिळाले पाहिजे म्हनीसन बळजबरी मिळतीस तरी 'ढोल' .जाहिराती नाकारस.इतकं सगळं राहिसनबी 'ढोल' नी वार्षिक वर्गनी नाममात्र आशी फक्त ३० रुपया शे.

अहिराणी भाशाना लेखक, लोक कलावंत, आदिवासी भाशाना लेखक, आदिवासी लोककलावंत यास्नी आपला परिचय, मुलाखत आनि आपला कलाविष्कार शब्द माध्यम मजारतीन प्रकाशित कराकर्ता 'ढोल' कडे संपर्क करवा. त्यास्न 'स्वागत' व्हयी.

कोळसा उगाळा तितका काळाच ऱ्हास. तरीबी महाराष्ट्रमजारला काही आदिवासीस सांगे, ज्या परकारे कुठे कुठे यव्हार व्हस तो मानोसपनले काळीमा लावनारा शे. कळंबना आदिवासीसवरला अत्याचार, नंदुरबार जिल्हामा व्हयेल कुपोशनना - भूक बळी. तशेच आता आता उघडा व्हवा लागात आशा ठाणा जिल्हामजारला बालमृत्यू. ह्या गोष्टीसमुळे मनं सुन्न व्हयी जास.

डॉ. सुधीर रा. देवरे
टेलिफोन कॉलनी, बसस्थानका मागे,
सटाणा-४२३३०१ जि. नाशिक, महाराष्ट्र.
दूरध्वनी : ०२५५५-२२४३५७

# कविता आनि लोकगीतं

## नवल

ती आदिवाशी धैडी
जीवनी भीतीखाल धडपडत
डोंगरना काठवर गयी
आनि चिटकीसन उभी व्हायनी
पालना गत, खडकले
उघडीनावगी
हजार सुरकुत्यास्न्या कातडीमा कोंबेल
हाडंस्नी मोळी जुनी.
मी थोडासा आदिवाशी जवू
आनि तिन्हाकडे पाह्यं,
त्ये नवलच -
तिना येक थानानी गठळी वरतीन
लोंबत व्हतं
आपलं पार्लमेंट
आनि दुसरी गठळी वरतून लोंबी व्हायंतं
आमनं साहित्यसंमेलन.

कुसुमाग्रज
(अनुवाद : डॉ. सुधीर रा. देवरे)

## म्हतारा म्हनंस.....

भीक वनी भीक
डोळा पुशीसन बये
थोडं तरी शीक ॥
तुन्हाकर्ता लुगडं वनं

मन्हाकर्ता आंगडं वनं
धान्य वनं, पैसं वनं
साहेब कडथून रडू वनं
त्यास्नाकर्ता घरवर
कुऱ्हाड कोयता पडाले पायजे
रस्तावर रंगत वकी
पोटनं पोर मराले पायजे
भीक वनी भीक
डोळा पुशीसन बये
थोडं तरी शीक ॥
पाव वना, बिस्कूट वनं
भांडं वनं, चूल वनं,
रग वनं, घोंगडं वनं
त्यानाकर्ता काळीजमजारली
माया थोडी सुटाले पायजे
मवालीस्ना वझाखाल
लाडकी आंडेर फुटाले पायजे ॥

कुसुमाग्रज
(अनुवाद : डॉ. सुधीर रा. देवरे)

## कविता

तिस्न काईभी चूकनं गाडाभर
ते कोनी काहीच बोंबलत नही
हायी साधी नुसती हासनी पदरमांन
ते ठनान गांवभर बोंबा बोंब व्हस...
तिस्नी काईभी कय
ते तिस्न कवतीक लागस
धाकलसा पोऱ्यास्ना माईक
हिनी तस काई चूकीसन कर... का झाय
ते सर्व्या रांडा मजगट लाईसन कोकलतीस
माय बोडीनी रांडले बिलकुल वयन लावं नही
'जनी पन गनी नही' गांड ठी बसी गयी,
हाई करस ते खोडसायपना करस

सगडी गल्लीमा आगाजा व्हस
जननारीना इज्ज़तना पंचनामा व्हस
तिन्ही शाक रांधी ते झनमन झायी
हिना सारखी सुगरीन नयाडीमां नही
आपीन थोडसं 'गोड' थाटीले लावो
ते म्हनतीस कशा 'हाई रांड शेनना पवो
त्या हासतीस ते फुले पडतस
हिन रडन भी वायफोक जास
'हूँ' मन्हीसन मरालोंग हिनी
घरमा 'कवडी किम्मत' ऱ्हास.......

**कृष्णा पाटील, अमळनेर**
(साहित्य अकादमी पुरस्कार विजेते)

## आक्खं मन्हं कपाळ

समदं नशीब फाटनं
देऊ किती ठिगळ
आभाळबी पाह्ये माले
शेकी ऱ्हावा वळ

बाप मन्हा दारूडा
सव बहिनीस्नं गाडं
जरा जरा कमाडी
आमी थोडं-थोडं वढं

गरीबीतला जलम मना
दुबळाशी जोड
वास त्याले दारुना
रोज मारझोड

व्हतं नव्हतं तेवढं
समदं त्यानी मोडं
पोऱ्यास्संगे त्यानंबी
गाडं मीच वढं

आक्खं मन्हं कपाळ

आशे फाटी गयं
कुशीमा शिरालेबी
उरनी नही माय

सचिन एकनाथ चित्ते

## कविता

जावानं जावानं आते पंढोरीले
तुल्हे आणि माल्हे सगयासले

इच्छूनं खाटलं आसा हाउ संसार
नुस्तच कुटार चव नही

रांधा वाढा झाडा रोजना उद्वेग
आते नको रोग परपंचना

संसारनी थैली रिकामीच तरी
भरी भरी भरी वाकी गउ

आते माय माल्हे वैतागचवना
घरना दारना सर्वासना

आजिबात आठे नही समाधान
देवनच ध्यान आते माल्हे

कमलाकर देसले



# भिलाऊ गाना (लोकगीतं)

गंगा सागरमा डूबी तरी जाय र
इना सासू मा जीव इना सासरा मा जीव
रमी तरी जाय र ॥१॥ गंगा सागरामा डूबी तरी जाय रं
इना ननीन मा जीव इना नंदई मा जीव
रमी तरी जाय रं ॥२॥ गंगा सागरम डूबी तरी जाय रं
इना जेठ मा जीव इना जेठानीमा जीव
रमी तरी जाय र ॥३॥ गंगा सागरम डूबी तरी जाय रं
इना देरानीमा जीव इना देर मा जीव
रमी तरी जाय र ॥४॥ गंगा सागरम डूबी तरी जाय रं ।

◆

साल्हेरना किल्ला आमी बांधी, बांधीला
तार लायी लायी, नवरदेवनी जान जेवाडू कशी
चिमण्या लायी लायी ॥१॥
मुल्हेरना किल्ला आमी बांधी, बांधीला
तार लायी लायी, नवरीनी जान जेवाडू कशी
लाईट लायी लायी ॥२॥

◆

लेक मनी वागाडी ल्याना व यायीन
लेक मनी वागाडी ल्या
नाकातली नथ घडी दिसू यायीन
लेक मनी वागाडी ल्या ॥१॥
कानातला टॉप्स घडी दिसू यायीन
लेक मनी वागाडी ल्या ॥२॥
गळातल्या पुतळ्या घडी दिसू यायीन
लेक मनी वागाडी ल्या ॥३॥
पायातला पैंजन घडी दिसु यायीन
लेक मनी वागाडी ल्या ॥४॥

◆

उच्चा डोंगर निचा महाल
देवीना दिवा जळे व लाल
लाडा काय पेनू रे मेरा साज

लाडा बाशिंग पेनू रे मेरा साज ॥१॥
उचा डोंगर निचा महाल
देवीना दिवा जळे व लाल ॥धृ॥
लाडा काय पेनू रे मेरा साज
लाडा फेटा पेनू रे मेरा साज ॥२॥
लाडा काय पेनू रे मेरा साज
लाडा सूट पेनू रे मेरा साज ॥३॥
लाडा काय पेनू रे मेरा साज
लाडा बूट पेनू रे मेरा साज ॥४॥

◆

मामा मांडोमा येवा मामा मांडोमा येवा
आदी हळदी कोणाच्या हाती, कोणाच्या हाती ?
आदी हळदी मामाच्या हाती, मामाच्या हाती
चूलता मांडो मा येवा, चूलता मांडोमा येवा
आदी हळदी कोणाच्या हाती, कोणाच्या हाती ?
हळदी चूलत्याच्या हाती, चुलत्याच्या हाती.
काका मांडोमा येवा, काका मांडोमा येवा
आदि हळदी कोणाच्या हाती, हळदी कोणाच्या हाती ?
हळदी काकाच्या हाती, काकाच्या हाती ?
दाजी मांडोमा येवा दाजी मांडोमा येवा
आदी हाळदी कोणाच्या हाती, हल्दी कोणाच्या हाती ?
हळदी दाजीच्या हाती; हळदी दाजीच्या हाती.

◆

मामा तूनी पोर अशी पळी गयी रं
सटाणा उतरी पार गयी र ॥१॥
मामा तूनी पोर अशी पळी गयी र
मोसम उतरी पार गयी र ॥२॥
मामा तूनी पोर अशी पळी गयी र
डोंगर उतरी पार गयी र ॥३॥
मामा तूनी पोर अशी पळी गयी र
तापी थडी उतरी पार गयी र ॥४॥
मामा तूनी पोर अशी पळी गयी र
पूरी मनातीन उतरी पार गयी र ॥५॥

◆

उकावरे लाडा लवकर
घर तूनी माय वाट पाय र ॥१॥
उकावरे लाडा लवकर
घर तूना बाप वाट पाय रं ॥२॥
उकावरे लाडा लवकर
घर तूनी चूलती वाट पाय र ॥३॥
उकावरे लाडा लवकर
घर तूना चूलता वाट पाय र ॥४॥
उकावरे लाडा लाडी घे र
घर भाऊ बहिण वाट पाय र ॥५॥

◆

मांडव मांडव करु नको लाडा
मांडव नही आपला
शंभर रुप्या ज्यो करे लाडा
मांडव शे आपला
मंडप मंडप करु नको लाडा
मंडप नही आपला
शंभर रुप्या ज्यो करे लाडा
मंडप शे आपला
कपडा कपडा करु नको लाडा
कपडा नही आपला
शंभर रुप्या ज्यो करे लाडा
कपडा शेतस आपला
फेटा फेटा करु नको लाडा
फेटा नही आपला
शंभर रुप्या ज्यो करे लाडा
फेटा शे आपला
लाडी लाडी करु नको लाडा
लाडी नाही आपली
हजार रुप्या ज्यो करे लाडा
लाडी शे आपली

**संग्राहक – अशोक भामरे**

◆

जीव मन्हा गया, गावले धाडा धोबी ।
अजून येत नही, लेकी संसारनी लोभी ॥

जीव मन्हा गया, जल्दी कर बंधुराया ।
सरती बोयावन, देखती आयाबाया ॥

जीव मन्हा गया, लेकी रडती साळंकी ।
तुम्ही समजाडा बायीस्वन, रात पडस कोळाखी ॥

जीव मन्हा गया, शेजी रडे घरमनी ।
मन्ही लेकी बाई, पोथी वाचे करमनी ॥

जीव मन्हा गया, चारी कडे चारी खांब ।
गरुड पक्षावर, छत्री धरे मन्हा राम ॥

जीव मन्हा गया, नको रडू माय बाई ।
मन्हा सरन भवती, दूहेरी लावा जाई ॥

जीव मन्हा गया, उशे मांडी भरतारनी ।
मांडी शीनायनी, घडी घाला रुमालनी ॥

जीव मन्हा गया, धाडा गावले माणूस ।
जमीन बारा कोस, चक्री बसना दिवस ॥

जीव मन्हा गया, शेजी वनी कुकू लाई ।
गवळी लेक मन्हा, आग्या बसना यारेमाई ॥

**संग्राहक : सिद्धार्थ जगताप**

## गुलाबाईनं गानं

पित्तरपाठनी खाता खाता पोई
गुलाबाई देस गुलोजीले टाई
पह्यली व गुलाबाई
देव देव साजे
साजीला मंडोबा
खेय खेळे खंडोबा
खंडोबानी राणी
आगस्तिनं पाणी
आगस्तिन पानी येळे घाट

पायभोरी ठोके लाट
हनुमान बायले राम राम सोभे
आक्काबाई जोबे
भाऊ भाऊ एकस तिर
आवस्थिर झाया ईर
बयकस हवा थंडीगार
गुलाबाईले करा नमस्कार
गुलोजी गुलोजी संकर राया
आम्ही पडतीस तुन्हा पाया
टिपरा खेळतीस सर्व्या बाया
पाडु नको आम्हले नाया
टिपरा खेसु, कपडा लेसु
गाना म्हनाना पर्साद खासु
घर जाई जपी जासु
कालदिन आखो आठे येसु
गुलाबाई सोदे गुलोजीले
सांगा रामा काय जोयजे
माले नको करधोडा
तुज आत्ते संगे जोयजे

संग्राहक : प्र. जा. देवरे



# सुखगाडीनी पुजा

मुलाखतकार : केदा वारू मोरे

*(भगत हिरामन सोनवणे आनि उपासक रामा पवार यास्नी मुलाखत.)*

आमनं गाव केरसानं, दसानं हायी गाव साधारन सटाणा तालुका ना पश्चिम दिशाले १८-२० किलोमीटर वर आदिवासी पट्टा मा बसेल शे.

आमना या आदिवासी पट्टा मजार गावसमा आदिवासी बांधवसनी संख्या भरपूर शे. कोकनी भील, हरिजन, मावची, कोरकू इ. प्रकार न्या आदिवासी जाती आगदी परंपरागत व्यवसाय चाली रिती सन उत्सव कारागीरी कला, लोककला इ जोपाशीसन आगदीच आनंदात रहातस आनि त्यासना ह्या पुजा पाठ आंधश्रद्धा किंवा उत्सव आम्हले जवळयीन पाव्हाले मीळतस. आम्हले त्यान खुपच नवल वाटस. त्यासना आनेक उपासनास पैकी येक डोंगऱ्या देवनी पुजा सर्वात श्रेष्ठ मानली जास तिना बदल सविस्तर खोल प्रपंच डॉ सुधीर देवरे (ढोलना संपादक) यास्नी ढोल मजारती सर्वा ऐरानी भाषाना वाचकसनं पुढे साधर करेलच से. तीच प्रेरना मी घीसन (केदा मोरे केरसाने) आदिवासी भील्ल समाजमा डोंगऱ्यादेवनी पुजा पाठोपाठ सुखगाडीनी पूजा ही उपासना २ नंबरनी महत्वनी मानली जास. त्या उपासना पद्धत बद्दल मी ढोल मासीकना वाचकस करता प्रत्यक्षात सुखगाडीना भगत आणि सरपंच रामा नाईक एक उपासक यासले भेटीसन खोल तपास करिसन प्रत्यक्षात त्यासनी मुलाखतच घीसन ढोलमा प्रपंच देवाना प्रामाणिक प्रयत्न करेल शे तो अश्या (सुख गाडी उपासना बद्दल तुमच्या कडून माहिती हवी असल्या मुळे तुम्हाला मी माझे घरी बोलावले आहे आशि मी त्यांना आधीच कल्पना दिली होती)

मी : या, याऽऽराम राम ऽऽ राम राम भगतदादा, सरपंच साहेब या बसा. माले तुमना कढती सुखगाडी बदल सविस्तर माहीती पायजे कारण ढोल नावन एक अैरानी भाषा मासीकमा तुमनी हायी परंपरा पुजा वाचकसले भी समजाले पाहीजे.

भगत : काही हारकत नही. आमनी लोक कला ना भी प्रचार प्रसार व्हवाले पाहीजे. विचारा काय प्रश्न से तुमना?

मी : सुखगाडी हायी देवता कोन ? कोना कुळातली शे?

भगत : सुखगाडी म्हणजे सात आसरा पैकी एक आसरा शें. आठवा म्हसोबा देव शे.

मी : ही सुखगाडी नी पुजा तुम्ही कव्हळ करतस?

उपासक (सरपंच रामाकाळू) : जव्हळ गाव वर काही संकट येस. उदा. दुष्काळ पडस, गावात रोग राइ फैलस, ढोर बक-या मरतीस आशा येळे आम्ही गावकरी आदिवासी दवंडी दीसन गोळा व्हतस आणि सुखगाडी

माय कोपनी म्हणून तीनी वीधीवत पुजा करान ठरावतस.

मी : मंग त्या पुजापाठ साहित्यले खर्च कोन करस? पुढे कशी पध्दत्तमा जातस.

उपासक : आम्ही पंच मंडळी वर्गनी करतस मंग सुखगाडी मायना भगतले सोपारी देतस आणि साहित्य काय लागस ते भगतले इचारीसन जमा करतस. मंग सर्व भगत जसे सांगइ तरसे प्रकारे आम्ही विधी करतस.

मी : (पुढला प्रश्न भगतले) सुखगाडी मायले काय काय साहित्य लागस?

भगत : एक कुवार येळून टोपलं त्यावर काडक्यासवर रंगीबेरंगी कपडाना निशान लावतस. मझार एक सव्वा मीटर नव कापड आथरी देतस, त्यावर नारळ वर शेंडी करी ठेवतस असि येक भगवा रंगन निशान त्यावर खोसी देतस. तीच मुख्य सुखआइ माता ऱ्हास. त्याना शेजार बाळातीन बाईले लागनारं सामान. उदा. टीकली, बांगडी, येणी फणी, सुपारी, हळद कुंकू, गुलाल, आगरबत्ती, एक तेल ना दिवा. येवडं साहित्य येवस्तीत मांडनी करणी पडस

मी : हायी जयी सुखगाडी मायनी स्थापना. पुढे कशी पद्धतमा पुजा पाठ चालस ते आमले सविस्तार सांगा सरपंच जी.

सरपंच : सुखगाडी मायनी मांड़नी भगत करस आणि मंत्र जंप म्हणीसन पुजा करस. पाच सवाशीनी बसाईसन पुजा करस मंग एक उपासक (पोऱ्या) ना डोकावर सुखगाडी मायले चढावतस आणि गाव मझारती ढोल पावरी ना वाजा वाजत गाजत गावना मेढया म्हणजे मारुतीना पारवर लई जातस. वटावर खाल उतारी सन भगत पुंजा पत्री करीसन मारुतीले दिवा लावस मंग ढोल पावरी वाला सतत वाजत-ऱ्हातस. गावतला मानस पोऱ्या सोऱ्या बाया बापडया गम्मत पाव्हाले जमा व्हई जातस.

मी : भगत दादा तुमले हाउ प्रश्न शे. हायी सुखगाडी माय मारुतीना मेढयावर (वट्ट्यावर) कव पावत ठेवतस.

भगत : पुढंला विधी मार्ग आशा शे की गाव जागल्या गावात लाला दवंडी पीटत फीरस ती आशी : माय बहीनीसव आपला गावतीन सुखगाडी काढनी लायी तीनी पुजा पत्री कराले लौकर पारवर चला, आशे गावातलाली बोंबा बोब व्हइ जास.

मंग सगळया आया बहीनी (सुवाशीनी) सुपडं घेतीस, त्यामा पीठ-मीठ, मीरची, दाळा साळा, गुळनाखडा, आगरबत्ती, हळदकुंकू, गुलाल, पुजा न साहित्य आणि रुपया, आठाना दक्षीना घेतीस आणि मारुतीना पारवर पुजा ले सुखगाडी मायपन येतीस.

मी : सुपड आनि पुजा नं साहित्य धान्य धुन्य घीसन सुवाशिनी सुखगाडी मायपन इसन कशी पुजा करतीस सरपंच जी.

सरपंच : भगत सुवाशिनीसले हळदकुंकू, गुलाल, वाव्हाले लावस आणि ते सुपडामजारल शिधा काढी घेस. सुपडामा थोडसं पीठ परत टाकी देस (चीमटीभर) आणि गौरीनी राख दया म्हनीसन सुपडाम टाकस आणि सगळा घरनी इडा पीडा, सगळा ढोर पोरसी इडा पीडा रोग राइ दुस्काळ हाटू दे सुखदे, असि मायले विनंती करानी.

आशा प्रकारे सगळ्या गावन्या सवासीनीसनि पुजा जई कि मंग भगत मारुतिले नारळ फोडस मायनी पुजा करीसन मंत्र जंप म्हनस आणि एक पोऱ्याना डोकावर सुखगाडी चडाइसन ढोल पावरी वाजत वाजत दुसरा गावनी शिव पावत लई जातस तठे मायनी गाडी शिववर उतारी ठेवतस आनि भगत आजुन पुजा पत्री करस.

मी : पुढे सुखगाडी वाजत गाजत दुसरा गावनी शिववर जातस. उतारी ठेवतस ती पुढे कशी पध्दतमा पाठवतस.

भगत : आम्ही शीववर तिनी पुजा पत्री करतस तो वर शिवार जागल्या पुढला गाववर जाईसन त्या गावना पंचसले खबर देस आमना गावनी सुखगाडी तुमना शिववर आनेल शे तीले तुम्ही गावात लइया अशी खबर मीळताच तठला पंच आदिवासी मंडळीले गोळा करी ढोल पावरी ना वाजा पुजान सामान घीसन शिववर सुखगाडी मायले घेवाले येतस.

मी : मंग पुढे ?

सरपंच : जशी पध्दत आपला गावले चालस आशाच प्रकारे मजल दर मजल करत हया गावतीन त्या गावले पुजा पत्री करत करत तापी नदी पावत सुखगाडीना प्रवास चालस.

मी : समजा एखादा गाव वालासनी सुखगाडी पुढे लयी नही गयात ते काय व्हस भगतदादा?

भगत : आशे कधीच व्हत नही. कारन सुखगाडी ही सुख संपत्तीनी माता शे. तीना कटाळा कोनी करत नही. तिना मुळे निश्चीत सुख संपत्ती मीळस हायी सगळासनी धारना शे. तरि भी जर आपून हायी सुखगाडी शिव वरतीन आपला गावमा मीरवत लयी गउ नहीत. ते सगळा गावसनी पीढा दुख दुष्काळ संकट आपला गाववर यी पडतीन आनि त्या गाव दुखना व्हई जातिन हायी भिती सगळासले वाटस त्यामुळे कोनी कटाळा न करता तापीना काठ पावत सुखगाडी मायनी यात्रा सफल व्हई जास.

मी : तापी काठले सुखगाडी मायले लई जातस मंग तिन्ही कशी इल्हेवाट लावतस?

भगत : तापी काठले सुखगाडी मायले ठेवतस. तठला भगत पुजा पत्री करिसन मंत्र जंप म्हनस. तिनी शांती करतस आनि नदी मायमा तिले वाव्हाडी देतस. आणि सगळा मीळी हात जोडी सुखसंपत्तिनी मागनी करतस.

मी : तर आशा पध्दतनी येक आदिवासी मंडळीनी आराध्य उपासना सुखगाड़ीनी सर्व साधारन चालीरीती शेतीस. या मा काळानुरुप काही उनिवा जरुर व्हतीन पन तरी या आदिवासी पुरे पूर प्रयत्न करिसन त्यासना परंपरा रुढया सन पालन इमाने इतबारे करी ऱ्हायनात, त्यासले प्रोत्सान देवाले पाहिजे. येवढच मन्ह म्हननं शे.

कथा

# सरगोंड्या

डॉ. सुधीर रा. देवरे

संध्याकाळे खेळता खेळता सायब्यानी माले इचारं ''सुरेश तू सकाळ शाळात जानार श्यास ?''

''मंग भो, का बरं ? ''

''मी नही भो, सकाळ ते श्याम देउळमा भागवत सुरु व्हनार शे''

''कैन्ह रे सकाळ ? समाधीना भागवत सकाळ सुरु व्हस ?''

''मंग, सकाळपशीनच''

''तुले काय  भागवत आयकना शे का मंग ?''

''नही रे भो सरगोंड्या. तू इसरी गया का मांगला सालन्या सरगोंडया ?
किती मजा वंथी तैन''

मांगल्या सालन्या सरगोंड्यास्नी याद येताच मी हरखी गऊ माले ती सगळी मजा जशीनतशी याद व्हती.

सायब्या रामपान्हे वना, ''सुरेश चालंस ना ?''

मी म्हनतं ''कुठे ?''

''सरगोंड्या''

सायब्याना हातमा येक कामडी व्हती, ती सरगोंडया खेळाले.

''मी काय घिऊ ?''

''ती तुनी येळुनी काठी नही का ती घेना''

मी येळु नी काठी घिदी,

सगळी गुखडी चेंदत खंदत आम्ही चालनू व्हतूत. रामपान्हे सगळ्या परसाकडे बशेल बाया काही आमले पाहिसन उभ्या राही जायेत. काही 'पोऱ्यानी जात शे' म्हनीसन बशी राहेत. आमले दुसरी चांगली वाटबी व्हती म्हना समाधीकडे जावाले, पन गुखडीमातून समाधी जवळ पडे. आणि गुखडीमातून गयं का सरगोंड्याच आदुगर लागेत.

तठे बराच पोऱ्या सरगोंडया खाई न्हायंतात. मी सायब्याले म्हनतं ''हायी पाहिली सरगोंडी खात खात आपू खाल समाधीजवळ जाऊ आनि मंग नदीमातीन हातपाय धुइ दर्शन करी यिऊत.''

सायब्या म्हने ''जाऊ दे. नको रे कसाले ?''

''पहीला दिन शे रे जाई यिवू चाल''

मंग तो राजी जया. आमी दर्शन करी भागवत आयकाले बसनूत. सगळा लोक गप बशेल व्हतात. बायाच जास्त व्हत्यात आयकाले. सगळ्या बाया कापुसन्या वाता वळी न्हायंत्यात.

भागवत वाचाले बाहेर गावना बामन आनेत.
बामन नुसता हरी ''अं..अं..अं.. अं ऽ''
आशे पोथी वाचे. त्यातलं काहीच समजेना
पन अध्याय जया का बामनसंगेच सगळा लोक म्हनेत,
''श्री राम जय राम जय जय राम हार इठ्ठल !''
मी येक मानोसले इचारं ''हायी.कसकाय समजस तुमले ?''
''हायी आता नुसतं वाची रायनात महाराज, दुपारतीन आर्थ सांगतीन''

बाया ते कापुसन्या वाता फुलवाता करामा दंग व्हत्यात. भागवत आंयकानं आणि वाता वळाण्या त्यासस्ले कसकाय जमत व्हयी ?

सायब्या माले उठाडाकर्ता घडी घडी खुनकाडी ऱ्हायना व्हता. मंग आमी उठनूत. बाहेर येत सायब्यानी माले इचारं ''हायी.कोनी समाधी शे ? ''

''पद्मनाभ स्वामीनी. मुल्हेरना उद्धव स्वामीना शिष्य.''

सरगोंड्या रवावाले हायी गर्दी व्हयी गयथी पोऱ्यास्नी. मंग आमीबी त्यास्मा समायी गऊत.

कोनी कोनले हाटकून ठोस दिये ते कोनी कोनले ढकली दिये. ढेंगडानी खारी माटी व्हती. म्हनुन सरगोंडी खूप गुळगुळीत व्हयी गयथी. मन्ही येळूनी काठी जसजशी घसाले लागी तसतसी मन्ही सरगोंडी जोरात सुटाले लागी. येक सरगोंडी जई का मंग ढेंगडं चढी येनं. मंग आखो सरगोंडी. आशे करता करता आमी खूप दमी गऊत.

सकाळीजले जर वनू ते दुपारले जेवालेच घर. दुपारले जेवन करी वनं ते संध्याकाळे अंधार पडनं का मंगच घर येवानं, मायले सांगी दिवू, ''दादाले सांगू नको बरकां ?'' शाळा ते रोज बुडे. पन आठ दिवसनी ते बात. येवढया सरगोंडया सोडीसन शाळात कोन जायी? खरं म्हनजे ह्या आठ दिवस शाळले सुट्टीच देवाले पाहिजे. पन तरीसुध्दा बराच पोऱ्या शाळात जातस, त्यास्ले कसकाय वाटत व्हयी बुवा. येवढी मजा सोडीसन शाळात जातंस त्या.

सरगोंड्या खाता खाता तवढामा सायब्याले आवळीमा मध दिसनं, पन त्यानी हिंमत व्हयेना, मध काढानी. मंग त्यानी दिल्याले सांगं, दिल्यानी झिऱ्याले सांगं. झिऱ्यानी भुऱ्याले सांग, आशी गर्दी व्हयी गयी मंग भुऱ्यानी दुसरी आवळीन्या फाट्या मोडीसन मध बशेल आवळीजवळ गया, सदरा पाठ मांगीतीन तोंडवर वढी घीदा आणि ती फाटीसनी जुडी मधमाख्यास्वर हालायी जोरजोरात म्हणाले लागा, ''आंदा.कांदा मोहन कांदा येक चावनी ते सगळया रांडा''

आशे म्हनत म्हनत त्यानी ते मध काढं तरीबी
त्याना हातले काही माश्या चावण्यातच. मंग ते
मध आम्ही सगळास्नी खादं.

संध्याकाळे माय म्हने, ''आज तुनी बाईनी पोऱ्या धाडा व्हतात तुले शाळमा बलावाले. कोनीतरी सांगी दिधं तुनी बाईले, तू रोज समाधीमा सरगोंडया खावाले जास आशे. तू मांगलादारथीन गया आणि पुढला दारे

लगेच पोऱ्या वंतात घर. बहुतेक तुले तुनी बाईनीच पाहय व्हयी समाधीकडे जातांना. मोरला दारथीन आल्हाद दखायी जास तुनी शाळा''

मी म्हनतं, ''मन दादाले सांगू नको बरका''

''कालदीस त्याबी इचारेत भो''

''काय ?''

''सुरेश शाळात जास का, म्हनेत''

''मंग तू काय सांगं ?''

''मी 'हं'.करी दिधं पन तू आतातरी शाळात जाय''

''दोनच दिवस ऱ्हायनात व्हं मा''

''परोंदीस ते श्यामदेउळनी जत्रा, मग मी शाळातच जासू ना''

''पन अभ्यास बुडस त्यानं काय''

''मी तो सगळा करी घीसू''

माय गप राही गयी.

श्यामदेउळनी आज जत्रा. ह्यायी गर्दी. जत्रामा दुकानं, आमनी शाळले भी आज सुटी व्हती. रोज शाळमां जानारा पोऱ्याबी आज जत्रामा व्हतात. डोंगरेज, वंडली, भंडारपाडा, वटार, ढोलबारा, केरसाना सगळा विरगावना आजुबाजुना गावस्ना लोक, बाया, पोऱ्या जत्राले इयेल व्हतात. आज सरगोंड्यासपेक्षा जत्रामाच जास्त मजा व्हती.

खेळण्या, खाऊ, मीठाई, वस्तु, शीट्ट्या आशा खुप दुकान इयेल व्हतात. श्यामदेऊळमा एक उलसा पोऱ्याले कृष्णनागत सजाडी वाजत गाजत आनी ठियेल व्हतं. दुपारले समाधीमा 'लळीत' सुरु व्हये. येगळायेगळा चालवर आणि गानासवर येगयेगळा सजाडेल. लोक नाचेत. एकमेकसंगे नाटक करानागत बोलेत. हिंदीमाबी बोलेत. आमले काही समजे. काही आजिबात कळे ना. पन गंमत म्हनीसन आम्ही पाही रायनु व्हतूत. संध्याकाळे त्या सजाडेल कृष्णनी हातमा भाला घीसन वर टांगी दियेल दहीहंडी तोडी.

दुसरा दिवस रामपाऱ्हे माले कशेच व्हवाले लागं; शाळनं नाव काढताच.

पोटमा गोळाच वना. सायब्या मना गल्लीना

दोस्त. त्यानी शाळा येगळी, मन्ही येगळी.

आठ दिवस शाळात गवू नही. बाई माले झोडीच काढी. माय म्हने,

''आता उरकाव जत्रा व्हयी गयी. आज शाळमा जाय.''

मी काहीच बोलनू नही. आंघोळ कयी.

च्या पीधा. दप्तर पिशवीमा नीट पाही

घिधं, तीकडे शाळनी प्रार्थना व्हयी राह्यनी

व्हती. मी अंगळटंगळ करी ऱ्हायनू व्हतू.

शाळनी प्रार्थना संपी गयी. पोऱ्या शाळमा इयेल दखायनात. मांगीतीन बाईबी शाळमा गयी. मी मायले

म्हंत ''माले बाई मारयीना'' ''मग तू आठ दिवस गया नही शाळमा काही कारन सांगी दे उकाव''

''तू बाईले घर बलाइ घे''

''कसाले ?''

''मारु नका आशे सांग''

''तू जाय मंग मी मांगेतीन बलायी घिसू''

''नको अत्ताच बलाव''

मायनी गल्लीतला भगवानले हाक मारी

भगवान वना त्याले मायनी सांग, ''समोरनी शाळातली ती गुरो बाई शे ना. तिसले म्हना, त्या काकुनी बलाय म्हना''

भगवान बाईले बलावाले गया. तवशी मी दप्तर घिसन मांगला दारे यी बठू. बाई वनी. माय तीनाशी ''या, या, बसा'' म्हनाले लागी. तवशी मी बोळातीन फीरीसन शाळमा जायी बठनु. पोऱ्या म्हनी थट्टा कराले लागात. ''कथा गयथारे कैन्हना?''

तवढात दुसरा म्हने, ''गावले गया व्हयीरे''

तवढात तीसरा म्हने ''आजारी व्हयीरे''

तवढात चौथा म्हने ''कसाना आजारी आणि कसाना गाव. तो सरगोंड्या खेळे समाधीमा रोज''

माले रडुच येवाले लागं व्हतं. तवसात

बाई वनी. मनाकडे न पाह्ताच

सगळासले म्हने, '' चला पुस्तके काढा.

बालभारतीचे पुस्तके काढा.

ध्रुव बाळाचा धडा पहा''

शीकाडता शीकाडता बाईनी म्हनाकडे जशे काही ध्यानच नही आसे पाही घिदं. मायनी तीले काय सांग व्हयी काय माहिती?

तवढात शीकाडता शीकाडता तीनी माले टोमना हानाच

''आशा प्रकारच्या ध्रुव बाळाचा आपण

आदर्श घ्यायचा. तशी ध्यानधरना करायची,

का शाळा बुडवून सरगोंड्या खेळायच्या ?''

ज्या पोऱ्यासले माहिती व्हतं त्या मन्हाकडे टवकारी पाव्हाले लागात

आनि मी आशा ठगवाई गऊ कनी, 'वर पाव्हानी हिंमतच जयी नही मन्ही...'

# अहिराणी लोकपरंपरा

डॉ. सुधीर रा. देवरे

## आण्हा : काव्यात्मक कुटं

परत्येक बोलीभाशामा कमी जास्त परकारना काव्यात्मक कुटं ऱ्हातंस. तशाच त्या अहिराणी भाशामा शेतंस. अहिराणीमा ह्या कुटंस्ले 'आण्हा' आशे म्हनतंस. अहिराणी भाशामा ह्या आण्हा खूप शिरीमंत आशी भाशामा गुंड़ाळेल ऱ्हातंस. पूर्वीसपशी त्या तोंडी परंपराखाल चालत इयेल शेतंस. ह्या आण्हा आयकात वाचात ते पूर्वीसना लोकं अडानी राहिसनबी त्यास्ले काव्यनी किती मस्त समज व्हती हायी आपला ध्यानमा येस. हयास्मा विचार कोडा, शब्द कोडा, वाक्य कोडा, भ्रम कोडा आढळतंस. येकदम सामान्य मानुसनी हुशारी, बुध्दीमत्ता, कल्पकत्ता आनि चातुर्य ह्यामजारतून ध्यानात येस. अहिराणी आण्हास्मा लक्षणा, व्यंजना, अभिधा यास्नाबरोबरच यमकं, अनुप्रास, श्लेश, उपमा, उत्प्रेक्षा, रुपकं, अतिशयोक्ती आशा अलंकारस्ना भरपूर वापर करेल ऱ्हास.

ग्रामीन भागस्मा आजली आजबी नातूस्ले आण्हा सांगस. उत्तर सांगाकर्ता नातवं इचार करी करी कटाळी गयात का मंग आजली त्यानं उत्तर फोडस. ह्या नातवंड आजला - आजली जयात का मंग त्याबी आखो आपला नातवंडस्ले आण्हा घालतंस. आशे हायी चक्र खूप पूर्वीसपशी चालत इयेल शे. जशा आता गानासन्या भेंड्या लावतंस तशे पूर्वीस्ले आण्हास्न्या भेंड्या लागेत. काही काही लोक पूर्वीससाई आपला काही येगळा शब्दबी आण्हास्मा टाकी देतंस. ते काही आपला सवताना आण्हाबी तयार करतंस. पन येकदाव नवं आण्ह सांगायन का ते लोकस्न आपोआप व्हयी जास. काही आण्हास्मा 'आनि मन्ह आण्ह जिकशी ते' आशी लालूचबी दखाडेल ऱ्हास, ती कशी, हायी पुढे दियेल काही आम्हास्मातीन दखाइच.

१. दक्खनकडथीन वनी नार, शेला नेसनी निळागार
कड्यावर व्हतं तान्ह बाळ, वर तुरा दे ढाल — मकानं कनीस

२. अटांगन पटांगन आथरा दोर
बिबु गयी पानीले, कोकायना मोर — नाडा, विहीर, कना, मोट

३. तीन पायना बांधा मळा, वर बठा तावजी काळा — चुल्ह, तवा

४. नानीले कान शेत, नानाले कान नही
नानीनं शहानपन, नानाले येत नही — कढई, बोघनं

५. हात लाल पाय लाल बसनेकु गादी लाल
तिकून वना तात्यासाहेब राम राम — मारुती

६. तालवर ताल बत्तीस ताल, त्यावर बसना मामलेदार - सूर्य
७. पानीसाई पातळ, निंबूसाई कडू
मन्ह आण्ह जिकशी ते दिसू सोनाना गडू - धूर
८. मारमार मुडदया आशा किती मारशी
लगन व्हवू दे, मंग जीव लावशी - वल्ली माटीना राजून
९. दक्खनकडथीन वना भाट, त्यानी घडा चौरंगपाट
घडाये पन मोड़ायेना - गोंदन
१०. दिधं ते ख़ात नही, नही दिधं ते खास - बैलले मुस्क
११. समींदरना काठले लायात केळी
हालतंस पन मुडत नहीत - हातपायना बोटं
१२. धड शे पन शीर नही
हात शेत पन पाय नहीत - आंगडं/सदरा
१३. काळी काठी तेल लायी लाटी
वाकस पन मुडत नही - केस - वेनी
१४. मी चालनू रागे रागे
तू काबरं मन्हा पाठमांगे - सावली
१५. आठशे कुऱ्हाडी नऊशे भाला
ना तुटे बाभुळबंद - सावली
१६. तुना बापन नही, मन्हा बापन नही
तिले लई ये मंग मजार जाय - कुलुप सांगस किल्लीकर्ता
१७. आथरी घोंगडी पसरात पाय
डुबडुब वाजे त्यानं नाव काय - सुपडं, दळन
१८. खाल तीन पाय, वर दोन पाय
हातात डालकी, भरतारनी वाट पहाय - च्याहूर, उपननं, वारा
१९. येवढा येवढा गडू, भुईमा दडू - कांदा
२०. येवढ येवढ झाड, घुंगरु घुंगरु भार - हरभरा
२१. मन्हा मामा गाव गया, दारशे बोकड्या टांगी गया - कुलूप
२२. मन्हा मामा गाव गया, दारशे गायी बांधी गया - चांदन्या
२३. मन्ह्या मामान्या खंडीभर गायी
सकाळले उठनू ते पत्ता नही -चांदण्या
२४. घरमा कट - चौकट
२५. नागरमा वन - कडावन
२६. वावरमा कूळ - ढेकूळ

२७. उथळ झिरा नितळ पानी
त्यामा पोहे मोनारानी - कढई, तेल, खंजोरी

२८. आथाईन गया भरेल, तथाईन वना मोकळा - केरन

२९. उची उची काठी लोखंडना भार
मन्ह आन्ह जिकशी ते दिसू तुले पार - टोकर

३०. येवढी येतढी डबी चुन चुन करे
मोठा मानुसले हैरान करे - इच्छू

३१. काळी गाय काटापेटा चेंदी जाय
पानीले पाही वसरी जाय - चप्पल

३२. सानावाटे गडू फेका झेलाले कोन नही
मारवाडी मरी गया रडाले कोन नही
पैसास्ना गंज पडा मोजाले कोन नही - चंद्र, साप, चांदण्या

३३. कोरडी हेरमा बगळा पोहेत - लाह्या

३४. येवढीशी खिडकी बत्तीस पिप्पळ - जीभ, दात

३५. दोन्ही भाऊ शेजारी, भेट व्हयेना सौसारी - डोळे

३६. गडगड चाले पन गाडा नही, नही इंद्र, नही चंद्र
मन्ह आन्ह जिकई तो तेजेंद्र - रहाट

३७. सडा शिपडा, बँड वाजाडा
कोकनना राजा बाहेर निघना - शौचास

३८. पानी नही, पाऊस नही, डोंगर हिरवागार
काथ नही, चुना नही, तोंड लाल लाल - पोपट

३९. दगडना देव, शेंदूर नी मानता
मांगला पाय वर करी पानी टाके
तो नर कोनता - कुत्रा

४०. चमक घोडी चमकदार
अशी उतरी गयी नदीना पार - वीज

४१. लाल पिशवी, चिप्पट दाना - लाल मिरची

४२. येवढी येवढी झोपडी लुकलुक करे
उखाराम आप्पा ये - जाय करे - शेंबूड

४३. आठे व्हती कथी गइ - नजर

४४. उचा उचा ताड शे
दखावामा लाल शे
खावाले गोड़ शे - ऊस

| | | |
|---|---|---|
| ४५. | लाल भात निळं बोघणं | - टरबूज |
| ४६ | येक शिशिमा दोन रंग<br>त्यानं नाव पांडुरंग | - आंड |
| ४७. | कोयडी हेरमा वाघ गुरगुरे | - घरोट |
| ४८. | बत्तीस लुगडा, शट्ट उघडा | - मकानं कनीस |
| ४९. | मन्हा मामा गाव गया<br>घरमां कुळीद पैरी गया | - ढेकून |
| ५०. | तुन्ही माय वासे, तुन्हा बाप टाके | - पोतं, चंपं, धान्य |
| ५१. | हिरवा घरमा धवळा बगळा | - कापूस |
| ५२. | डोंगर येवढी म्हैस, तिन्हा लोखंडना थाना<br>तिन्हा गडी भलता शाना | - आगगाडी |
| ५३. | हरन पळे दुध गळे | - घरोट |
| ५४. | मन्हा मामा गाव गया, भितले आरसा टांगी गया | - शेंबूड |

## धोंडया धोंड्या पानी दे

पानकळामा येळवर पाऊस पडना नही का मंग अहिराणी भागमा पानी मांगानी पध्दत शे. पहिला चांगला पडी गया आणि मजारच पानकळानी डोळा वटारी दिधात तरीबी हायी पानी मांगानी रीत शे. गावना मारुतीले नदीना पानीवरी आंघोळ घाली ते पानी नदीनी धारले मिळायी देवानी. हायी जयी येक पध्दत. पानी येत नही म्हनिसन गावना मारुतीले शेनवरी लिपी देवानं हायी दुसरी पध्दत. आनि येक मानूसले धोंडया करीसन गावभर घरोघर पानी मांगनं, हायी तिसरी पध्दत. आशे करामुळे न येनारा पाऊस हाटकून येस आशी इथली ग्रामीन श्रध्दा शे. आनि आशी भाबडी श्रध्दामुळेच हायी येक आदिम प्रथा परंपरागत पद्धतखाल आजपावत चालत इयेल शे.

माले लहानपने कळा लागं तशे हायी प्रथा अमना विरगावले मी कायम पाहत वनू. तिन्हामा भागबी घियेल शे. आनि आजूनबी कधळ मधळ आमना गावना गावकरी धोंड्या व्हयीसन पानी मांगतंस.

आगोदर आदला दिवस गावात दंवडी येस. ती आशी ''आपला गावले कैन्हना पानी नही, म्हनून सकाळ रामपहारले मारुतीले आक्खा गावनी पानी घालनं शे. घरपरत येक मानुसनी तरी पानी घालाले येवा होऽ'' आशीच पद्धतनी हायस्कूलमाबी नोटीस येस : ''गावात पाऊस नसल्यामुळे मारुतीला पाणी घालण्याचा कार्यक्रम उद्या गावकऱ्यांनी ठेवला आहे. ह्या कार्यक्रमात विद्यार्थ्यांनी सहभाग घ्यावा अशी सूचना देण्यात येत आहे.''

दुसरा दिवस सगळा गावना लोकं, जवानं जमतंस, शाळातला पोरं येतंस. ज्याना त्यानापन आपआपला भांडा न्हातंस. बादल्या, गुंडा, चरव्या, तांब्या, कलश्या अश्या भांडा घिसन नदीमातीन पानी आनाले सुरवात व्हस. त्या भांडा मारुतीना आंगवर मोकळा व्हतंस. ते पानी नदीकडे घी जावाकर्ता काही मानसं किरकोळ अशी

बारीक चारी खंदत नदीकडे घी जातंस, खेळना सर शाळातला पोरंसले शिस्त लायीसन पानी आनाले सांगतंस. परत्येकनी कमीत कमी पाच खेपा टाकवा अशी श्रध्दा शे. कोनले जास्त खेपा करन्या राहीन्यात तरी चालतीस. तोपावत नदीनी धारले पानी लागी जास. मंग काही जन मारुतीले नवा शेंदूर लायी नारळ फोडतंस, कोनी नदीमा आंघोळ करीसन घर जास. अशा पद्धतना मारुतीले पानी घालाना कार्यक्रम व्हस.

मारुतिले पानी घालाना आशा परकारना कार्यक्रम करीसनबी पानी वनाच नही, ते गावातला लोक वाजत गाजत मारुतीना पारवर शेननं साबडं भरी आनतंस, आनि गवऱ्या थापाडतंस तशा आक्खा मारुती शेनघाई लिपी देतंस. जर त्या दोन-तीन दिवसात पानी वनाच ते आखो वाजत गाजत पानीनी मिरवनूक काढीसन मारुतीना पारवर येतंस. मारुती वरलं शेन काढीसन त्याले मस्त आंघोळ घालतंस. त्याले नवा शेंदूर लावतंस. नारळ फोडतंस. आनि पानी वनाच नही, तरीबी ते शेण आपोआप वळाइस त्यान्या खपल्या खाल गळी जातीस. काही शेन मारुतीले तशेच लटकेल ऱ्हास. आणि मंग जैन्ह पानी यी तैन्ह त्यांनी आंघोळ घालतंस. मारुती शेणवरी लिपेल नंतर कैन्हबी पानी वना तरी मारुतीले आपू शेनवरी लिपं म्हनूनच पाऊच वना आशीच त्यास्नी समजूत ऱ्हास. तशेच मारुतीले पानी घालीसन येक-दोन दिवसात पानी वना ते मारुतीले पानी घालं म्हनुनच पाऊस वना आशी लोकरनी समजूत व्हस.

पाऊस येवाकर्ता आजून येक विधी करतंस. त्यानं नाव धोंड्या. आंगवर कमीतकमी कपडा ठिसन येक जवान सजाडतंस. त्याना डोकावर निंबना पालानी जुडी बांधी आशा पध्दतखाल ठेवतंस ते त्यानं तोंड सहजासहजी कोनले दिसनार नही. त्याना कंबरले बैलना गळामजारली गेज बांधतंस, पायस्ले घुंघरु बांधतंस. आनि डफना वाजामा त्याले गावना परत्येक घरना पुढे गाना म्हनत नाचाडतंस. ज्याना घरना मोऱ्हे हाऊ धोंड्या येस त्या घरनी बाई हया धोंड्याना डोकावर हंडाभर नहीथे चरवीभर पानी वतंस आनि दक्षिना (पैंसा नहीथे धान्य) देस. तधळ डफना तालवर धोंड्या नाचस. येक हातवरी त्याना डोकावरली निंबना पालानी जुडी धरी ठेवंस. घरोघरनं पानी डोकावर पडी पडी धोंड्या थंडीघाई काकडायी जास. म्हनून ज्याले लवकर हिव भरत नही आशा धोंड्या मुद्दाम निवाड़तंस. धोंड्या नाचानं येळे त्याना संवगडी लोक डफना आवाजात मोठ मोठया आरोळया मारीसन गाना म्हनतसं. त्यापैकी काही गाना आशा ऱ्हातंस :

१. हेट्याना पानी चालकरी वना माय
चालकरी वना
बांध बंधन्या फोडत वना माय
फोडत वना
चिडी मुंगी रगडत वना माय
रगडत वना
काळी बंधनी तोडत वना माय
तोडत वना
हेट्याना पानी चालकरी वना माय
चालकरी वना

२. धोंडया धोंडया पानी दे
च्याऊ म्याऊ पिकू दे

३. धोंडया धोंडया पानी दे
हातात खुरपी बायको तिरपी
पानी दे वं देवनी माय
हातात खुट्टी बायको बुट्टी
पानी दे वं देवनी माय

४. आर्धी रोटी बगलमे
पानी वना जंगलमे.

आशा परकारना गाना म्हनत म्हनत आनि घोशना देत देत आक्खं गाव मांगाई गयं का मंग गोळा व्हयेल पैसा आनि धान्यना दाममातून मारूतीले शेंदूर, उदबत्या, नारळ घिसन पूजा करतंस आनि आखो पैसा उरनातंच ते धोंडया व्हयेल जवानले टोपी टावेलबी घेतंस.

आशा परकारना येगयेगळा विधी करीसनबी डोळा वटारेल पाऊस पानकळामा गरजीसन पडसंच आशे नही. पन तरीबी अंधश्रध्दामातीन का व्हयेना हायी लोकपरंपरा अजूनबी टिकेल शे. आनि पावसाळा वना का अहिराणी भागमा खेडापाडासमा 'धोंड्या धोंड्या पानी दे' आशा आरोळ्या आयकाले मिळतीसच.

## उखाना (नाव घेनं) : येक नाजूक संबंध

अहिराणी आन्हा स्नागतच अहिराणी उखाना शिरीमंत शेतंस. लगनना येळे, लगनात, लगन लागी गयं का मंग, जेवानं येळे, पहिला मुळ्ळले, सत्यनारायननी पुजानंपुढे नवरा-नवरी येकमेकस्न नाव यमक यी/आशा दोन वळनी मांडनीमा म्हनतंस. त्याले 'उखाना' आशे म्हनतंस. थोडकामा उखाना म्हनजे दोन वळीस्ना कवितास्मा जोडीदारनं नाव घेवानी रीत.

पूर्वीस्ले बायको हयातभर नवरानं नाव तोंडमा येऊ दिये ना. त्यास्ले, यास्ले, अमूकंना बा, तुमना भाऊ, तुमना दिर, तुमना आंडोर आशा पद्धतखाल बाया नवराना 'उल्लेख' करेत. आतासुद्धा खेडास्मा नवराना आशाच 'उल्लेख' व्हस. तशेच दादया मानूस सुद्धा बायकोनं नाव चारचौघरस्मा घिये ना. तुमनी हू, तुमनी भावजयी, तुमनी बहिन, तुमनी आंडेर आशा बायकोना 'उल्लेख' व्हये. पन उखाना घेवानं येळे नवरा बायको हया दोन वळनी यमकी कवितामा येकमेकना खरा नावं अगदी सहज घेतंस.

लगनमा नवरा-नवरीस्ले त्यास्ना नातेवाईक, मित्र-मैत्रिनी, कलौऱ्या, कलौरा, नाव घेवाले भाग पाडतंस, आग्रह करतंस आनि मंग नवरा नवरी सरमायी सरमायी येकमेकस्ना नावं घेतंस. उखानास्मा येकमेकसबद्दल आदरभाव, प्रेम, दखासच. पन, मस्करी, थट्टा, इनोद, खोडी, अवगुन दखाडनं, कोपरखिळ्या मारनं, चिमटा घेनं आशा गोष्टीबी उखानास्मातीन आपूले दिसतीस. उखाना ते गम्मतच शेत. आठे सगळाच देता येनार नहीत.

काही उखाना आशा :

१. फाटेल कुडचं तुटक्या बाह्या
....... पाटीलनी भाकरपुरती माया

२. टाळ वाजे मृदुंग वाजे, वाजे मल्हार वीना
............ नं नाव घेस वंदे मातरम म्हना

३. नदीनी वाळू चाळनीवरी गाळू
चाल चाल...... आपू चौकट खेळू

४. नागरता नागरता सापडनी कवडी
.......... मन्हा गुडघायेवढी

५. आगलदार मागलदार व्हता द्राक्षना येल
......... बसनात पुजाले ते मी देस बेल

६. समींदरना काठले नाग नागिनीना येढा
......... इतला येडा ते रातभर वाटे पेढा

७. आडी भित पडी भित, भितवर व्हती चरवी
......... दिसंस बरी पन नांदई तधळ खरी

८. आद घर, मद घर, करत व्हतू शिरा
तिकून वनात राम, जशा चमकना हिरा

९. आडी भित पडी भित, भितवर व्हती परात
......... स्नी वाट पहात बसून मी घरात

१०. भितले व्हतं सानं, सानामा व्हतं मत्यारं
........ नं नाव घेवाले लावयी, ते पत्यारं

११. आटक मटक चवळी चटक
........ कयी बायको खरी, पन काळी मटक

१२. आंबाना वनमा पाखरुनी चाहूल
....... ना घरमा मन्ह पहिलं पाऊल.

१३. दारशे व्हता नीम, त्याले बांधा झोका
...... नाव घेस सगळा झन आयका

१४. पोळाना दिन बयलसवर झूल
....... जशे मन्ह गुलाबनं फूल

१५. नदीमातला फेना पाहिजुई आना
......... मन्हा ध्यानमा नही वना

# आदिवासीसना दैवतं

आदिवासी श्रध्दामा अनेक परकारना देवं आढळतंस. डोंगऱ्या देव, वाघदेव, नागदेव, खांबदेव, म्हसोबा, मुंजोबा, मावल्या आशा परकारना अनेक वीर दैवतं आदिवासी लोकं भजतंस.

**वाघदेव :**

आदिवासी लोक डोंगर दऱ्या जंगलस्मा ऱ्हातंस. प्राणीस्नं जे वस्तीस्थान ऱ्हास तेच आदिवासीस्नबी वस्तीस्थान ऱ्हास. म्हनून त्यास्ना देवस्मा अशा 'प्राणिसदृश्य' देव दिसनात ते नवल वाटत नही.

येकादा आदिवासी कुटुंबमा येकादा मानोसले कैन्हतरी वाघनी ख़ादं व्हयी. त्यावर हल्ला करा व्हयी, ते त्या कुटुंबमा वाघदेवनी कायम वडिलोपार्जित पूजा व्हस. हाऊ वाघदेव धातूपशी घडावतं नहीथ आनि तो देव्हारामाबी ठेवतं नहीथ. वाघदेव लाकूडमा नहीथे दगडमा कोरीसन तो कुठे बसाडाना हायी भगतकडे सकून पाहिसन ठरावतंस. त्या लाकूडवर/ दगडवर फक्त वाघनं चित्र कोरेल ऱ्हास. दगडना जया ते त्याले 'चिरा' बी म्हनतंस. हाऊ चिरा वावरना बांधवर, कुठेतरी मेरवर नहीथे घरना आजूबाजूले आपला खाजगी जागावर जमीनमा रोवतंस, नहीथे गावनी येसवरबी स्थापना व्हस. ह्यानी स्थापना चैत्री पुनीले नहीथे दसराना दिवस करतंस.

येकदाव हया देवनी स्थापना जयी का मंग दर वरीसनी चैत पुनीले आनि दसराले त्यानी पूजा व्हवाले पाहिजे आशी लोक परंपरानी श्रध्दा शे. परत्येक कुटुंबना येगयेगळा देव स्थापन करेल ऱ्हातंसच आशे नही. काही देव सार्वजनिक ऱ्हातंस. ज्या कुटुंबना कोनी मानोस वाघनी मारा नही आशा लोकबी वाघदेवनी पूजा करतंस. यानं मोऱ्हेबी वाघदेवनी आमनावर कुरुपा ऱ्हाऊ देवा आशे म्हनीसन हायी पूजा ऱ्हास.

वाघदेव स्थापना करेल आजूबाजूनी जागा शेनवरी सारवतंस. वाघदेवले शेंदूर लावतंस. उद्‌बत्ती लावतंस. त्यानं मोऱ्हे आंडं ठिसन नारळ फोडतंस. मंग कोंबडा नहीथे बकरा मानवतंस आनि मंग तो तठेच कापीसन त्याना रंगतना टिळा वाघदेवले लावतंस. मंग कोंबडा/बकरा घर आनिसन त्यानं मटन शिजाडतंस. आनि शिजाडेल मटन-भात ना निवद दखाडीसन जेवन करतंस.

वाघदेवनी पूजा इकडे बागलाण, कळवण तालुकामा कोकणा लोकस्मा प्रचलित शे. भिल लोकस्मा वाघदेव नी पूजा दिसत नही.

**नागदेव :**



वाघदेवना उगमनागतच नागदेव पूजानी पध्दत शे. ज्याना घरमा कोनी मानूस नाग चाई मरी गया व्हयी - पान लागी गमी गया व्हयी, त्या ते नागदेव बसाडतंसच. पन ज्याना घर आशी घटना घडनी नही, त्या घर यानं मोऱ्हे आशे व्हऊ नही म्हनून नागदेवनी पूजा व्हस.

नागदेवनी मुर्तीबी आशीच दगडमा नहीथे

लाकूडमा कोरीसन सकून पाही स्थापना करतंस.

नागदेवनी पूजाबी दसरा, चैत पुनीले आनि सरावन महिनामा नागपंचमीले करतंस. वाघदेव साई नागदेवनी पूजामा थोडासाच फरक शे. नागदेवनी पूजा करानं येळे पूजा करनारा मानोसनी सोच्छ आंघोळ करेल पाहिजे. जमीन शेनवरी सारवीसन त्यावर शिवारातला देवसइतका तांदूळना पुंजका ठेवतंस. दूध ठेवतंस. नारळ ठेवतंस. आठे नारळ फोडतं नहीथ. तशेच सगळा निवद चोखड व्हास. इसडा व्हात नही.

हायी पूजाबी इकडला कोकणा लोकस्माच दखास. भिल्लस्मा दखात नही.

**खांबदेव :**

खांबदेव हाऊ वेगळा देव शे आशे नही. वाघदेव आनि नागदेव यास्न्या मुर्त्या दगडमा नहीथे लाकूडमा कोरीसन त्या जमीनमा रोवतंस. ह्या देवस्ना आकार दूरथीन जमीनमा खांब रोवतंस तशा दखास. ह्या आकारवथीन ह्या देवस्ले 'खांबदेव' आशे म्हनतंस. वाघदेव आनि नागदेव ह्यास्न्या दूरथीन दिसनाऱ्या खुनास्ले 'खांबदेव' आशे म्हनतंस. ह्या खांबदेवस्मा परदेश परत्वे येगयेगळा देवं दखातंस. पन कळवन, बागलान, पिंपळनेर, साक्री, नवापूर, शेलबारी, ह्या भागस्मा 'खांबदेव' म्हनजे येकते 'वाघदेव' नहीथे 'नागदेव' म्हनीसन वळखतंस.

**म्हसोबा :**

म्हसोबा हाउ येक उग्र देव शे. गावनी शिवले, वावरना बांधले नहीथे मेरले यानी स्थापना व्हयेल व्हास. हाऊ देव दगडवर कोरतं नहीथ. येक लांबट ओबड धोबड दगड जमीनमा थोडा बुंजी दिधा आनि त्याले शेंदूर लाया का जया म्हसोबा. म्हसोबा फक्त दगडनाच व्हास. लाकूडना नही. म्हसोबा हाऊ येक खंतड देव म्हनीसन त्यानी वळख शे. आदिवासीस्ना बरोबर बाकीना नागर - ग्राम्य लोकंबी याले भजतंस. वावरातला पीक कापानं येळे म्हसोबाले नारळ फोडं नही ते धान्यनं बैलगाडं तो कानी करी देस, आशी ग्रामीन श्रध्दा शे. म्हसोबाले सावलीनी सोयबी करतंस. बाकीना दैवतंसले ती व्हात नही. म्हसोबाना आजूबाजूले त्यानी उचीसाइ थोडासा मोठा चार लाकडं रोवतंस आनि सुतारवरी कळसनागत पत्राना आकार करीसन चारीमिरे पाऊसनं पानी वहायी जाई आशा बसाडतंस. याले म्हसोबाले 'सावली करनं' आशे म्हनतंस. काही म्हसोबा काही लोकस्ना सपनमा यीसन सावली कराले सांगतस.. आनि भक्त म्हनून तशे करस.

म्हसोबाले आंघोळ घालीसन शेंदूर उदबत्ती लाइ नारळ, कोंबडा, बोकड्याना निवद लागस. म्हनजे कोंबडा, बोकडया कापीसन त्याना रंगतना टिळा म्हसोबाले लावतंस! आनि मटन शिजनं का बोट्यास्ना निवदबी.

**मुंजोबा :**

मुंजोबा हाऊ फक्त आदिवासीनाच देव शे आशे नही. ह्या देवले ग्रामीन-नागर लोकबी भजतंस. मानतंस. त्यानावर श्रध्दा ठेवतंस.

मुंजोबा देवनी मुर्ती व्हात नही. हाऊ येक अमुर्त देव शे. पिपळना झाडवर तो व्हास आशी समजूत शे. संध्याकाळे येखादं येकलं दुकलं उलसं पोरगं पिपळना झाडजवळ गयं ते त्याले मुंजोबा घी जास. मुंजोबा त्या पोरगाले पिपळवर घी जास तधळ ते बी गुप्त व्हयी जास. मुंजोबा त्या उलसा पोरगाले त्यानाजवळ सात दिवस ठि घेस. त्याले मुरमुरा, गुळ, खोबरं खावाले घालंस, सात दिवस जयात का मंग तो त्या पोऱ्याले झाडखाल

सोडी देस. मुंजोबा घी जायेल मानोसनं आयुष्य शंभर वरीसन मोऱ्हे जास, आशी समजूत शे.

संध्याकाळे येखादा मानोसनी पिपळना झाडजवळ लघवी कयी ते त्याले मुंजोबा धरस. तो आजारी पडस. सकून पाह्य ते त्याले मुंजोबा लागना आशे कळस. गंडादोरा करीसन आनि सात दिवसं पिपळनी पूजा करीसन त्याले फेऱ्या घालात ते मुंजोबा त्याले सोडी देस, आशी श्रध्दा शे.

मुंजोबा फक्त उदबत्ती आनि पूजाना भुक्या ऱ्हास. हाई ग्रामीन श्रद्धामुळे बराच पिपळना झाडं गावोगाव आजूनबी शाबूत शेत. त्या कोनी तोडंत नहीत. पिपळनां लाकूड मुंजोबामुळे कोनी जाळत नही, हायीबी त्यानंमांगे येक कारन शे.

### डोंगर देव :

डोंगर देव ते आदिवासीस्ना मुख्य देव शे. त्याना उत्सव १५ दिवस चालस. त्यानी बी नेमकी आशी मुर्ती नही. हाऊ अमूर्त देव शे. डोंगर देव नी सगळी माहिती ह्यानं आगोदर 'ढोल' मातीन दियेल शेच. म्हनून आठे फक्त 'उल्लेख' करीसन थांबस. ('ढोल', अहिराणी, अंक-२)

आदिवासीस्ना आशा गंजच दैवतं शेतंस. वीरदेव शेतंस. पन आठे नमूद करेल शेंतस, त्या मुख्य दैवतं. ह्या दैवतं, आदिवासीसपन जे सहज ऱ्हास त्यास्नाच भुक्या ऱ्हातंस.त्यास्ना राग लोभबी आदिवासीस्नागतच घटकाभरना ऱ्हातंस.

(आदिवासीस्ना दैवतंस्न्या पूजा-अर्चा-निवद- समजूती ह्या पध्दतीस्ना परिचयन मांगे अंधश्रध्दाले उठाव देवाना प्रयत्न नही. आदिवासीसन्या दैवत लोकपरंपरा नेमक्या काय शेतीस, त्यास्ना वेध घेवाना हाऊ उद्देश्य शे.)



# अहिराणी लोकगायक
# रमेश सोनवणे व कस्तुराबाई शिंदे

सचिन एकनाथ चित्ते

१

रमेश महादू सोनवणे हाऊ येक अहिराणी लोकगायक शे. यानं शाळनं शिक्षान तिसरीपावत ऱ्हायीसनबी वयना बाराव्वा साल पशी तो डफवर लोकदैवतसना येगयेगळा गाना गास. रमेश सोनवणेना पंजोबाखापरपंजोबा ह्या सुद्धा लोकगायक व्हतात. रमेशले हायी बाळकडू आजा-बाप-काका यास्नाकडून मिळनं. तशेच तो लहानपने मेंढ्या चाराले जाये. रानमा धनगरस्संगे त्यानी गाठ पडे. त्यास्नाकडथूनबी रमेश काही गाना शिकना. रमेशना आवाजबी नैसर्गिक शे. आशा गाना गाता-गाता येक कॅसेटवालानी रमेशले हेरं. आनि रमेशना आवाजमा त्यानी अहिराणी गानास्न्या येगयेगळ्या कॅशेटी काढ्यात. रमेश फक्त आपली कॅशेट निंघी ऱ्हायनी यामाच खुश व्हता. धंदा मात्र कॅशेटवालानी करी घिदा. आज रमेशन्या जवळपास अहिराणी गानास्न्या चवदा कॅशेटी शेतीस. उदारनार्थ रमेशनी गायेल दोन गाना :

१. काळा घोडानी काळी वं माय
वर-वर चाबूक चालत जाय
तठून घोडा हबकना ना माय
तठून घोडा हबकना
धनगरना दारशे थबकना ना माय
धनगरना दारशे थबकना
धनगर दादा थरथर कापे
मायनं आसन घी घी नाचे माय
मायनं कांबळं घी घी नाचे

२. कानबाई नौरत बठी वं माय
मालन नौरत बठी वं माय
अरे कसाना घट इले भरू वं माय
अरे नारळना घट इले भरू वं माय, नारळना घट इले भरू वं माय
अरे नारळना घट फुटना बार
अरे उतर कानबाई पहिला पार
कानबाई पळे मन्ही
मळे मळे दार

२

कस्तुराबाई रामचन्द्र शिंदे हायी भराडी जमातनी महिलानं शिक्षान फक्त चवथीपावत शे. हायी महिला पारंपारिक गाना नुस्ता गायीसन म्हनतच नही त्ये त्या चालीस्वर नवा गानाबी तयार करंस. कस्तुरबाईले ल्हानपनपशीनच गानास्नं येडं व्हतं. तिन्हा म्होरे तमाशाना आदर्श व्हता. तशेच दारोदार ती टिंगरीवरबी गाना म्हने. गवळनी, लोकगीतं, भिलाऊ गीत, घरोटवरला गाना, टिंगरीवरळा गाना, आशा येगयेगळा गाना तिन्हा तोंडवरी आयकीच न्हावा आशे वाटंस. ''हिरवा करून शिनगार'', ''भागे भागे बोल आई चत्रशिंगी'', ''वनीनी आंबाबाई'' ह्या तीन अहिराणी गानास्या कॅशेटी प्रसारित व्हयेल शेतीस. कस्तुराबाईबी रमेशना माळकेच फक्त नावनी भुकी शे. गाना गायीसन आपला आपला ''चन्द्रमौळी'' झोपडास्माच ह्या दोन्ही गायक आपली साधना जित्ती ठी न्हायनात.



# अहिराणी स्त्री साहित्य

डॉ. सुधीर रा. देवरे

बहिणाबाई चौधरी यास्ना कवितास्ना अपवाद वगळा त्ये अहिराणी लिहेल साहित्यमा स्त्री साहित्य जवळजवळ नहीच. तशे अहिराणी लिखेल साहित्यमा बाईवर लिहेल शे, पन बाई लेखिकानी अहिराणी भाषामा लिखान करेल नही. त्यामुळे आठे सगळा अहिराणी साहित्यना आढावा घेवानं ठरायं.

आज सगळा भारत देशमा जवळजवळ अठराशे बोलीभाषा सापडतीस. त्यातलीच येक अहिराणी शे. धुळा, नंदुरबार, नाशिक, आनि जळगाव अशा चार जिल्हास्ना भौगोलिक परिसरनमा हायी भाषा बोलतंस. येवढा मोठा परिसरमा आनि जवळजवळ चाळीस लाख लोक हायी भाषा बोलतंस-वळखतंस, तरीबी फक्त बोलीभाषा म्हनीसनच वळखास-अशी अहिराणी हायी येकमेव बोलीभाषा व्हयी.

अहिराणी लोकसाहित्यमझारली स्त्री आनि अहिराणीमा लिहेल साहित्य, अशा दोन भागमा हाऊ विषय मांडानी कोशिश करेल शे.

**१. अहिराणी लोकसाहित्यमझारली बाई :**

अहिराणीमा लिव्हाना आनि छापाना प्रयत्न आज दिसत नसना तरी पूर्वीस्ले अहिराणी तोंडी साहित्यना गाजावाजा व्हता. तशीच गत अहिराणी स्त्री साहित्यनी शे. आज अहिराणीमा येकबी बाई साहित्यीक नही. पन तोंडी लोकसाहित्यमझारला मसच भाग बाई जाणीवनी म्हनेल दखास. अहिराणी लोकसाहित्यमझारला धबधबामातून थोडा बहुत संकलनं आज वाचाले मिळतंस तरी मुळपशी अजून सगळाच येचायना नहीत. अहिराणी मझारला या धनवर सहज ध्यान गयं तरी आपू नवल कराले लागी जातंस इतका हाऊ ठेवा लाखना शे.

लगनना गाना, झोकावरला गाना, आखाजीना गाना, धोंडाना गाना, धोंड्याना गाना, सनस्ना गाना, खंडोबाना गाना, तळीभराना गाना, गवराईना गाना, गुलाबाईना गाना, कानबाईना गाना, मोटवरला गाना, भलरी गाना, काठीकवाडीना गाना, थाळीवरला गाना, डोंगऱ्या देवना गाना, टापऱ्या गव्हाराना गाना, आदिवासी गाना, भवाडाना गाना, खंजिरीवरला गाना, कापनीना गाना, वावरातला गाना, भिलाऊ गाना, देवस्ना गाना, देवीस्ना गाना, आडीजागरनना गाना आशा लोकगीतं, कोडा, आन्हा, उखाना, म्हनी, वाक्प्रचार, सुभाषितं, गप-गपाडा, लोककथा, नीतीकथा, ओव्या, घरोटवरला गाना, बारातल्या गाळ्या, भारूड, आरत्या, लळीत, गन, गौळन, लावनी, पवाडा, नाव घेनं, तमासा मझारली लावणी, यवहारमझारल्या गाळ्या....

अशा परकारना मसनस दालनं अहिराणी तोंडी लोकसाहित्यमा इखरेल दखातंस. आवढंच कसाले, मरेल मानोसकर्ता दुख दखाडाले अहिराणी बाया गाना नागत हेल काढीसन रुढीखाल जे रडतंस त्यास्नी सुदीक अहिराणी लोकसाहित्यमझार गनना करनी पडयी.

वरला काही दालनंस्मातीन मासला म्हनीसन काही काही साहित्य हिरा पाहूत. खाल दियेल

उदारनास्मातीन स्त्री जानीव ध्यानात येस.

म्हनी :

- काम नही काय करु, नवं लुगडं दांडे करु
- आसू ना पासू, मरी गयी सासू
- आयजीना जीववर बायजी उदार
- गोगलगाय, पोटमा पाय
- आईवर ना बाईवर, जाई पडी फुईवर
- दुभती म्हैसन्या लाथा गोड
- दळे तिले कळे, फुकटी गोंडा घोळे
- नाकवर पदर तिन्ही येशीपन नजर
- भाकरी पाव्हा काठले, बायको पाव्हा व्हटले

हया म्हनीस्मझारतून बाईस्ना रोजना काम, आपसातला नाता, मोठापना, धाकटापना, दिसनं, जाननं, रहानं यास्मझारला फरक, खस्ता आनि खाऊगुल्ल्या, हिशेबीपना, कडीजखडीना गुन आनि अवगुन, रसिकपन आनि जानी घेवान्या युक्त्या अशा सगळा गुन वरल्या म्हनीस्मा दिसतंस.

**आन्हा :**

आन्हं म्हंजे कोडं. जो आन्हं सांगंस त्यानी सगळी हुशारी त्यानी सांगेल आन्हास्मा दखास. तशे पाहे त्ये आन्हा रचानं सगळं काम आपला पूर्वजस्नी करी ठियेल शे. त्यास्नं नाव-गावबी कोनले माहित नही. अशा द्रष्टा लोक लोककलावंत-लोकशाहीर व्हतात.

उदारन :

१) दक्खनकडथीन वनी नार  
तिन्ही गुफा चौरंग पाट  
घडाये पन मोडाये ना — गोंदन

२) तीन पायना बांधा मळा  
वर बठा तावजी काळा — चुल्हं, तवा

३) नानीले कान शेत, नानाले कान नही  
नानीनं शहानपन, नानाले येत नही — कढई, बोघनं

४) काळी काठी तेल लायी लाटी  
वाकस पन मुडत नही — केस, येनी

ह्या आन्हास्मातून रुढी रिवाजमझारली स्त्री जानीव टहाळबन दिसंस, चुल नी मूल, वावरातला औजारं, सैपाकना भांडा, कपडा, केस, सजनं अशा गोष्टीस्ना चिन्हास्ना आडोसाखाल आन्हास्मातून शब्द व्हटवर यी न्हातंस.

**ओवी :**

अहिराणी ओवी रुपकं, प्रतिकं, प्रतिभा, अर्थसौंदर्य, नादसौंदर्य अशा सौदर्यालंकारस्मा नटेल शे. तिन्हा

आविष्कार चित्त वेधी घी अशा शे. लोक जीवनना सार रोजनी सोपी बोलीभाशामा संगाळेल शे. उमाळा, हसू, प्रेम, करुणा, रसाळपणा, तत्वज्ञान, काव्य, विचार, भावन, गोड, स्नेह, सेवा, उत्साह, सहनशीलता, उपकार, त्याग, सुख, लोभ, कर्तव्य, पराक्रम, भक्ति, निर्मळपणा, निर्व्याजपना अशी सगळी गुनस्नी दिवाळी अहिराणी ओवीमा पाव्हाले मिळंस.

अहिराणी बाई सवताना अनुभवमझारतीन मिळेल ग्यान ओवीमझारतीन गास. सगळा मानव जीवननी पारख ओवीमा दखास. अहिराणी ओवीमझारतीन जीवनमझारल्या सगळ्या जानीवा बाहेर पडतीस. काही ओवीस्मा गूढ जाणीवाबी दखातीस.

रोजना जीवनमा आपला मानोस सांगे येकरुप व्हयेल मनमिळाऊ अहिराणी बाईन्या ओवीमझारतीन खूप प्रेम पांझरी ऱ्हास. ह्या प्रेमले कोणतीबी मेर नही. भाऊ बहिननं प्रेम, सेवा, त्याग, प्रेम, कष्टंन जीवन, सोशिक जीवन ह्या सगळ्या गोष्टीस्ना पोत ओवीमा घट्ट इनेल ऱ्हास. साद्या भोळ्या भाबड्या शब्दस्मझारतीन बाईना व्हटवर इयेल ओवी आयकनारा मानोसना कान मोही टाकतीस.

उदाहरन :

१) पानीवाल्या बाया तुम्ही उचला घागरी
मन्हा बंधुरायाना पुढे जाऊ द्या पांभरी

२) जावयीनी जात उडीदमुगथान खेत
लेक मन्ही चंद्रज्योत, याना मनी नही येत

३) भावजयी सीता तू कसाले गयी खेता
मिरगीना पानी तुले लागा घर येता

ओवीमझारलंच दुसरं दालन शे घरोटवरल्या ओवीस्नं.

### घरोटवरल्या ओव्या :

धान्य दळाकर्ता अगुदर पीठन्या गिरन्या नव्हत्यात. पहाटले उठीसन बायास्ले घरोटवर धान्य दळनं पडे. दळानं येळे व्हटमा ओवी वनी का घरोट हलका जास अशी बाईस्नी समजूत व्हती. बाई घरोटवर बसनी का तिले आपोआप ओव्या येवाले लागतीस, अशी अहिराणी ओवीनी ख्याती शे.

उदाहरन :

१) घरोट रे भाऊ, नको जड जड जाऊ
बाजरीना मिसे, मी दळंस वल्ला गहू।

२) माय माय करू, माय सोनानी परात
मायना बिगर, माले गमेना घरात

३) पंढरपुरले बाई, पैसाले माळा इस
हात मन्हा पुरेना, इठ्ठला खाल बस।

### बारमझारल्या गाळ्या :

आखाजीना दिवस जोडे-जोडे बशेल दोन गावस्मा बायास्ना बार व्हस. बार म्हंजे लढाई. बारमा

गानास्मझारल्या गाळ्यास्मझारतून दुसरास्न्या उन्यादुन्या काढतंस. वरीसभरातली मनमा साचेल मळमळ अहिराणी बाया आखाजीना दिवस बारमा मोकळी करतंस. हायी मळमळ बाहेर निंघानं येळे ह्या गाळ्यास्मा अश्लिलता येस. तरीबी ह्या गाळ्या कोनी मनले लायीसन कज्या करत नही. हाऊ येक परकारना खेळ व्हास.

उदाहरन : काही गाळ्याः

१) हिरवं लुगडं कोनं वं
शिपाई दाद्या तिन्हा वं

२) वाही वनी परात
हायी सकी घुसनी घरात

**उखाना :**

उखाना म्हंजे नाव घेनं. लगनमा नहीते उत्सवना प्रसंगमा बायकोनी दोन नहीते चार वळीस्मा गानास्मझारतीन नवरानं नाव घेनं. नहीते नवरानी बायकोनं नाव घेन ह्याले 'उखाना' म्हनतंस. पूर्वीस्ले बायको नवरानं नाव फक्त उखानास्मातूनच घिये. सहज रोजना बोलना-चालना मझारतीन नवराना नावना उल्लेख जया ते हायी गोट अशुभ म्हनीसन पाह्येत. त्यानामुळे ह्या नाव घेवाना परकारले खूप महत्व व्हतं.

उदाहरन :

१) मांगलं दार पुढलं दार
द्राक्षना येल।
राम बसनात पुजाले
मी देस बेल॥

२) आद घर, मद घर
करत व्हती शिरा।
तिकून वनात राम
जशा चमकना हिरा

३) दारशे व्हता आंबा
त्याले कवळी कवळी पत्री।
रामना हातमा
सोनानी छत्री॥

'राम' या नावना जागे घरना मानोसनं खरं नाव घेवानी रीत शे.

अशा सगळा अहिराणी लोक साहित्यमझारला येगयेगळा परकारनं तोंडी परंपरास्ना वेध घिदा त्ये अहिराणी मझारलं लोकसाहित्य आनि त्या मझारलं बाई साहित्यनं दालन किती प्रगल्भ शे तशेच भाषानी जानीव किती खोल-बळकट शे, हायी ध्यानात येस.

अहिराणी बाई लोकसाहित्यमझारला काही मुद्दा :

१. अहिराणी लोकसाहित्यमझारल्या बायास्न्या ओवीस्मा काव्य आनि तत्वज्ञान यास्ना मिलाफ व्हयेल दखास.

२. बाईस्न्या ओव्यास्मझार टहाळबनखाल आपलाकर्ता सीता आनि घरना मानोसकर्ता राम अशा रुपकं येतंस.
३. बाईना त्याग, सेवा, प्रेम, कष्ट, सोशिकपना अशा गोष्टी अहिराणी बायास्न्या ओवीस्मा येतीस.
४. अहिराणी बाई लोकसाहित्यमझारली बाईनं वर्णन हायी सगळ्या भारतमझारल्या बायास्नं चित्रन शे.
५. प्रेम, वात्सल्य, शृंगार, मधुरपना, सोज्वळपना, नाजूक जानीव ह्या गोष्टी अहिराणी बाई गानास्मा दखास.
६. माय-आंडोर, माय-आंडेर, भाऊबहिन, नवराबायको, बाप-आंडोर, सासू-ऊ अशा सगळा नातास्नं वर्तन आनि काळीजनं चांगलं प्रेम अहिराणी लोकगीतास्मातीन दखास.
७. मानवी भाव-भावनास्ना मोट्ठा कळस लोकसाहित्यमा आढळंस.
८. अहिराणी ओवीमा मानोसना चांगला चित्रनं इयेल शेत.
९. बाई हायी रुढीखालच चुल नी मूल यामाच अडकेल व्हती, हायी अहिराणी बाई गानास्मातीन ध्यानात येस.

**२. अहिराणीमझारलं लिहेल साहित्य :**

अर्वाचीन साहित्य : अहिराणीमा बहिनाबाई चौधरी यास्ना अपवाद वगळा त्ये लिहेल बाई-साहित्य नही. तरीबी बाकीना साहित्यना-म्हंजे दाद्या मानोसनी लिहेल अहिराणी साहित्यना आढावा आठे घेवानं ठरायं.

लिहेल वाङ्मयनी लोकव्यवहार मझारली जागा लोकवाङ्मयना गत ऱ्हात नही. लिहेल वाङ्मय जागरुक मानसंस्मुळे टिकी ऱ्हास. लिहेल साहित्यले जपाडी ठेवनारा नहीथे छापनारा भेटना नही त्ये साहित्य काळना आडे गडप व्हयी जास. म्हनीसन अहिराणीमझारलं लिहेल साहित्य येक हातना बोटंस्वर मोजता इथिन एवढाच आज सांगता इतीन. पूर्वीस्ले अहिराणीमा काही लिखान व्हयेल व्हयी पन कोनी जपाडी ठेवनारा नव्हता म्हनीसन त्ये नष्ट व्हयी गयं व्हयी.

भरतना नाट्यशास्त्रमा अहिराणीना विभाशा म्हंजे बोलीभाशा म्हनीसन उल्लेख येस. तशेच वररुचीना व्याकरनमा अहिराणीना अपभ्रंश म्हनीसन उल्लेख इयेल शे. आशा पुरावा पाह्यात त्ये अहिराणी भाशा इ.स.ना तिसरा, चौथा शतक इतकी जुनी शे, हायी ध्यानात येस.

लिहेल साहित्यमा अहिराणीना पहिला उल्लेख लिळाचरित्रमा मिळंस. मराठीमझारला या पहिला गद्य ग्रंथामझार बराच अहिराणी शब्द आनि वाक्य आढळतंस.
उदाहरन : ढासलं, रांधलं, पुंजं वगैरे. म्हंजे बारावा शतकमा अहिराणी भाशाले चांगला दिवस व्हतात, आशे म्हननं पडयी.

श्री ज्ञानेश्वर यास्ले ज्या भाशा इयेत त्यामा संस्कृत, मराठी आनि बागलानीना (म्हंजे अहिराणीना) समावेश व्हता. ज्ञानेश्वर यास्नी येक बागलानी गवळन प्रसिध्द शे.

मे दुरार्थि कर जोडु। ताऱ्हो सेवा न जाणु ॥१॥
मन्हारे कान्हा मन्हारे कान्हा । देखी कां न गिणारे मन्हां कान्हा रे ॥२॥
तन्हा मराठी देश । मन्ही बागलाणी भाष ॥३॥
घटि पटि विजार। खडे भाले तलवार।

बाप रखुमादेविवरु जाण। ऐसे मन्हा कान्हा ॥४॥

(ढेरे रा. चि. १९८३; पृ. २०६, ओवी क्र. ६१६)

संत ज्ञानेश्वर यास्नाच बागलान नवरीना रुपक अभंगबी प्रसिद्ध शेतंस

''करी वो अद्वैत माला केले इसन्यो सहिंवर सिद्धपुरसिगे।
बोलू नही तया दादुला भवसागरी न सरत के ॥धृ॥
मन्ह्या वऱ्हाडनी नवजनी सांगीतनी सब बाटा सोया
अनुहात तुरे वाजोनी गगनी जगी जाया सोहं या
मन्हा पतीपर्यंत त्याले देखी वो जग जाय। आंधय ॥१॥

(ढेरे रा.चि. १९८३, पृ. १४५-१४६, ओवी क्र. ३४९)

यासाई श्री ज्ञानदेवयास्नाच काही अहिराणी पदंबी सापडतंस

''यशोदेना बाय तान्हा मले मन्हे हाइ लें वो,
मी तं बाई साधी भोई गऊ त्याना जवई,
येईसन बिलगना फाडी मन्ही चोयी ॥१॥

(तेलंग दि. ह., १९५४)

संत ज्ञानदेव यास्ले 'बोली अरुपाचे रुप' दखाडनं व्हतं, त्यास्नी बागलाणी भाशामा काव्य करीसन आपली प्रतिज्ञा पुरी त्ये कयीच पन बागलाणी बोलीबी तव्हढी प्रतिष्ठानी व्हती हायीबी त्यामुळेच आपोआप सिद्ध व्हयनं.

'राधामाधवविलासचंपु' म्हंजे 'शहाजी महाराज चरित्र' हाऊ ग्रंथ जयराम पिंडे या कवीना शे, हाऊ ग्रंथ शके १५७५ त्ये १५८० ना दरम्यानना व्हयी. ह्या ग्रंथमझार बागलानी काव्यनाबी समावेश शे. ग्रंथमा बागलानी आशा उल्लेख येस आनि तिन्हा मुख्य भाशास्मा समावेश करेल दखास.

शहाजी राजाना दरबारमा ज्यानी अहिराणीमा स्तुती करेल शे, त्यानं नाव मोरीरना भाट आशे शे. त्यानं काव्य आशे शे :

सोरठा

विनती असे तुम पास मि मोरिर ना भाट शौं।
शाह झनी तुम हास, बागलाणन्हा बोल ले ॥

(राजवाडे वि. का. संपादक : 'राधामाधवविलासचंपू')

मोरिरना भाट हाऊ कवी बागलान मझारला राहनारा व्हयी, पन त्याना नक्की पुरावा सापडत नही.

अहिराणीमझार काव्य लिव्हनारा बागलानमा अजुन एक कवी व्हयी गया. मुल्हेरजवळना अंतापूर या खेडामझारला तो रहिवाशी व्हता. 'कमलनयन' हायी त्यानं नाव व्हत. त्याना काळ इ.स. १६८० त्ये १७५० आशा व्हयी. त्यानी लिहेल काव्य काळमा नामशेष व्हयी गयं, पण त्यास्ना 'अभंगावली' काव्यग्रंथ आजबी मुल्हेरले पाव्हाले मिळंस.

'कवी कमलनयन' यास्नं येक अहिराणी काव्य :

''मान्हा हरि मी सऊ हरिना पोसनावो,

जन्मोजन्मीना दास श्रद्धवासनावो,
काय गरज मुक्तनी, माले रतीसे भक्तीन्ही भाव भासनावो ॥धृ॥
(अभंगावली)

'कमलनयन' नावना कवीनी अहिराणीमा रचना करेल शे, आशी नोंद प्रमान मराठीना अभ्यास करनारंस्नी अजून घियेल दिसत नही. मराठी वाड्मयना इतिहासमाबी कमलनयन नावना कवीनी नोंद नही.

शके १६४८ मा जैन कवी निंबा यानी येक पोथी लिहेल शे. या पोथीमा 'अहिराणी' या नावनंच भक्ती व उपदेशनं येक अहिराणी गीत शे. जैन कवी निंबा या विदर्भातला ऱ्हायीसनबी त्यास्नी अहिराणी शब्दस्ना वापर करले शे. तठे, जीनपास, त्यान्हा, मन्हा, त्याले, मन्हं, मननी आशा शब्द त्यास्ना काव्यमा दिसतंस. पन हायी काव्य आज उपलब्ध व्हत नही.

ह्या रचनाससायी 'अर्वाचीन' कालमझारला राजकीय आणि आध्यात्मिक ग्रंथस्मा अहिराणीना लिहेल भक्कम पुरावा सापडत नही, याना अर्थ या रचनाससायी प्राचीन-अर्वाचीन काळमा अहिराणीमा लिखान जयं नशे, आशे म्हंता येनार नही. अहिराणीबद्दल पाठकस्नी-पुरानिकस्नी आढी आनि आकस याना मुळे अहिराणीमझारलं सगळं लिखान नष्ट व्हयी गयं व्हयी. थोडकामा, अहिराणी भाशाले भक्कम राज्यनी सत्ता आनि ग्रंथनी सत्ता मिळनी नही म्हनीसन अहिराणी भाशा फक्त बोलीभाषा उरनी.

## अहिराणीमझारलं आधुनिक साहित्य :

अर्वाचीन अहिराणी साहित्यना तुलनामा आधुनिक अहिराणी साहित्यमा खुप काही हातले लागत नही. पन पुढलं आश्वासन मिळयी आशे वाटंस.

अहिराणीमझारला आत्ताना लिखानना आढावा घिदा त्ये येक टहाळबन नाव डोळासमोर येस त्ये म्हंजे बहिनाबाई चौधरी. बहिनाबाई चौधरी आडानी राहिसनबी नवल वाटयी आशे तत्वज्ञान त्यास्ना कवितास्मझारतून दखास. जवळजवळ त्यास्न्यां सगळयाच कविता लोकगीतं आनि ओव्यास्ना गत शेतीस. तरीबी भाशाना नीट इचार कया त्ये हायी कविता अहिराणी भाशानी कविता म्हंता यी का ? आशा प्रश्न समोर उभा ऱ्हास. बहिनाबाईनी कविता 'अहिराणी कविता' या नावखाल सगळा महाराष्ट्रभर वळखास. तरी ह्या कवितामझारला शब्दस्मा - उच्चारस्मा अस्सल अहिराणी भाशा नही. मराठीकडे झुकयी हायी लकब सोता कवयित्रीनी का त्या कवितास्वर संस्कार करनारा व्यक्तीनी, हायी ध्यानात येत नही.

अहिराणी लोकवाड्मय संकलननं काम श्री दा. गो. बोरसे यास्नी मोठा हुरूपखाल करेल दखास. हायी काम येकलादुकला मानोसनं नव्हतच, म्हनीसन त्ये अपूरं ऱ्हायनं. श्री बोरसे यास्नी 'जिभाऊ' नावनी कादम्बरी लिखी. त्या कादम्बरीना अवकाश खांदेश राहिसनबी आनी काही पात्र अहिरानी बोलतंस तरी तिनं निवेदन प्रमान मराठीमां शे. हाऊ भाषा बद्दलना न्युनगंड का लेखकनी मर्यादा, हायी समजत नही. श्री बोरसे यास्ना 'अहिरानीची कुळकथा' ह्या पुस्तकातूनबी इशेश काही हातले लागत नही.

देशीवादना लेखक श्री. भालचंद्र नेमाडे यास्नी समीक्षाना गत लिखानमाबी 'रावन्या' हाऊ अस्सल अहिराणी शब्द वापरानं धाडस दखाडं. त्यास्ना 'मेलडी' आनि 'देखनी' ह्या मराठी कविता संग्रहस्माबी काही कवितास्मा अहिराणी शब्द - अहिराणी वाक्प्रचार जानीबुजीसन वापरेल दखातंस. हयात देनं लागतो, रिन,

ठेवसान तथी राहिन, गोखलं, गोवरी जाने, हयाती राहो, माथा, सोद्या, तोहमत, धार्जिनी, आवई, औखात, याद इ. अहिराणी शब्द - वाक्प्रचार श्री. नेमाडे यास्ना काव्यमा आढळतंस. 'खांदेशनी फांदा मारा' न्या जीवनजानिवा त्यास्या मराठी कवितामा दिसत असन्यात तरी आनि भाशिक 'क्षमता' राहिसनबी येकबी सगळी कविता त्यास्नी अहिराणीमा लिहेल नही. सगळी अहिराणी कादंबरी हायी त्ये खूप दूरनी गोट शे. पन त्यास्न्या मराठी साहित्यमझारतीन - जास्त करीसन कवितास्मझारतीन अहिराणी बाईजानिवा जास्त दिसतीस.

प्रा. राजा महाजन यास्न्या काही अहिराणी कविता उपलब्ध शेत. तशेच त्यास्नी काही अहिराणी कथा लिहेल शेत. आनि लोकवाङ्मय वर त्यास्नी लिखान करेल शे.

बापुराव देसाई यास्नी 'आक्खी हयाती' नावनी येक अहिराणी कादंबरी लिहेल शे. पन तिनामा कादंबरीनं सूत्र नही. काही संकलनबी श्री देसाई यास्नी करेल शेत.

प्रस्तुत लेखकन्या 'तव पावत काढवा याळ' आनि 'मी आन्सा भुताळीन' ह्या दोन अहिराणी आदिवासी कथा बाई पात्रमुखी शेतीस. 'तवपावत काढवा याळ' मझारली बाई परत्येक आघातनंतर कुटुंबकर्ता उभी ऱ्हावाले पाहास. गरीबीसंगे झगडाले पाहास. पन हाय खात नही. त्ये 'मी आन्सा भूताळीन' मझार अंधश्रद्धाना फायदा घीसन आपला सोताना सूडकर्ता येक अबला बाईले भूताळीन म्हनीसन नावगी 'मिरवनूक काढंस आनि तिन्ही क्रूर हत्या करंस. ह्या क्रौर्यमा पुरुषसाही बायाच पुढे ऱ्हातीस, आशे चित्रन शे. आदिवासी समाजमझारल्या बायास्नं हायी खरं वास्तव शे.

प्रस्तुत लेखकनाच 'आदिम तालनं संगीत' ह्या अहिराणी कविता संग्रहमझारबी काही बाई जानिवा दखातीस. पन ह्या जानिवा पुरुषना दृष्टिकोन मझारतून इयेल शेत. स्त्री जानिवास्मझारतून नहीत.

कृष्णा पाटील, सदाशिव माळी, रमेश सूर्यवंशी यास्नींबी अहिराणीबद्दल काही संकलनं संपादनं करेल शेत. पन सोतानी येगळी कलानिर्मिती नही, ह्या सगळा संकलनं मराठीमा शेतस. यास्नं माध्यम अहिराणी नही. आजून आखो अहिराणीकर्ता झटणारा मानसं बराच शेतस. पन त्यास्नी कोणतीबी अहिराणी साहित्यकृती, संपादनं नहीथे संकलनं उपलब्ध नहीत. म्हनून त्यास्नी चावळ आठे करता येत नही.

संदर्भ :

१. ढेरे रा. चिं. (संपा.) (१९८३) 'संकलसंतगाथा' खंड १ला
२. तेलंग दि. ह. (प्रकाशक) (१९५४), 'श्री ज्ञानदेव यांची अभंगगाथा'
३. राजवाडे वि. का. (संपा.) 'राधामाधवविलासचंपू' (जयराम पिंड्ये)
४. कमलनयन : 'अभंगावली'
५. बहिणाबाईच्या कविता
६. बोरसे दा. गो. : 'खानदेश वाग्वैभव', 'जीभाऊ', 'लोकनाटय', 'अहिराणी ची कुळकथा'
७. नेमाडे भालचंद्र : 'टीकास्वंयवर', 'मेलडी', 'देखणी'
८. देवरे सुधीर (संपा.) : 'ढोल' (अहिराणी), अंक क्र. १,२,३,४
९. देवरे सुधीर : 'आदिम तालनं संगीत' (अहिराणी कवितासंग्रह)
१०. देवरे सुधीर : अहिराणी लोकपरंपरा (अहिराणी लेखसंग्रह- आगामी)

# अहिराणी ओव्यांसमझारलं बहिण-भाऊनं ''प्रेम''

जनार्दन देवरे

बहिन-भाउनं प्रेम दखाडनाऱ्या ओव्या अहिराणी भाशामां खुपच शेतीस. ह्या ओव्या बहिनीसनां गळामजारथी अजूनबी ऐकू येतीस. तशे पाह्यं त्ये बहिन आनि भाऊ या एकच शिपलातलां दोन मोती. त्यामुळे या दोन्हीस्नं एकमेकवर जीवपेक्षा जास्त प्रेम ऱ्हास. तेच बहिनी या ओव्यास्मजारतीन आपलापुढे मांडतीस. बरं या 'ओव्या' समजालेबी सहज आणि सोप्या ऱ्हातीस. त्यानामुळे त्यास्ना अर्थ सांगानी भानगडमाबी हायी ठिकाने काही पडत नही. फक्त या ओव्या दोनतीनदा वाच्यात, म्हनजे सगळच कशे एकदम सोपं व्हई जाई. ओव्यास्मजारलं 'सौंदर्य' आति 'प्रतिकं' भी तुमले सहज समजतीन.

भाऊनां गुन सांगतांना बहिन म्हणसं :

''गाय म्हशीसना भाऊ धोनार चतुर
हातमा चांदीनी कसंडी, कमरे रेशमी धोतर।''

''काळा नि सावळा जसा उडीदना दाना
म्हणू भाऊसाठे, क्रिष्णदेव तुरे शाना।''

''गोरा मना भाऊ याले शिवु टाका कोट
गल्लिमां चाले नीट, मेहुनानी पडी दीट।''

''गहु हरबरानी कशी पिवळी खयवाडी
रासले माप लाये, भाऊ मना मारवाडी।''

वाटनां वाटसरु बंदा रुप्या देउ तुले
दुबळा भाऊनी खुशाली सांग माले ।।

''झाडनां बिगर गाव दिससं उघडं
भाऊना बिगर कोनी घेयना लुगडं।''

''अंगनात उभी माले, धाक नही कोना
मावलीना 'लाल' वाघ डकारत वना।''

आपला धाकटा भाउनी शाळात जाईसन शिकाले पाहिजे असे बहिनले वाटस, मंग ती म्हनसं :

''लिखनार भाऊ तुले कसानं रडू येसं
हाते दऊत लिखनी पाटीका वझं व्हसं।''

''ओसनं कंबरले तीसनं दांडीवर
भाऊ तुना राजे आरसा मांडीवर।''

''मन घर पावना शेजाबाई हासे
मना भाऊराया फुल गुलाबनं दिसे।''

''सनम्हानं सन, सन दिवायीना खरा
असाग ओवाया मना मावलीना हिरा।''

''पहाटनां पारे लागे चवथ्यानी न्यारी
भाऊले सांगू लेक देजो मना घरी।''

''भाऊ करु याही पैसानं लावु पोतं
भाची करु सून, जशी इल्लयनी जीतं।''

''माले मूळ वना बंधुजी लाडका
साकर सेवाया वर तुपना सडका।''

''पाप्या पाप लागे मना लुगडाना काठ
भाऊ कशा म्हणे, तशी नही मनी पाठ।''

''खांदावरना पदर भी ते माथावर घेऊ
गवयी भाऊ मना तुनी मरजीले भेऊ।''

''उभी गल्लीले मी जाऊ गल्लीले देर जेठ
भाऊ कसा म्हणे, भैन पदर घेना नीट।''

''मन घर व पावना, दाय नही वरणले
भाऊशे पावना खडीसाकर पुरनले।''

''दिवाळीनं मूळ नका परतावू सासरा
भाउले ववाळाले सन नहीसे दुसरा।''

''कावया कोकाये कावयाना काय गुण
भाऊ शे पाव्हणा माले सोनानां व दिन।''

''भाऊ करु याही माले वढाले तोडाले
भांऊ तुना बैलं, मनी खतनी गाडीले।''

''साकरनां शिरा मी ते करु लसलसं
बहिननां घर भाऊ सोड एकादस।''

कव्हळं मव्हळं बहिन भाऊवर, ते कैन्ह तिना नवरावर भी रागे भरस आणि म्हणसं :

''राम राम करु राम नुसता बोलाले
सोनानं कुलूप मन्हा बंधुनी माडीले।''

''भाऊ भाऊ करु डोया जयात कुंकावानी
परकी नार वनी, भाऊ जया लोकवानी।''

अशे जरी जये तरी तिले भाऊनी काळजी कायम लागी न्हास, ती म्हनंस -

''पडसं पावसा, पडी जाये चहुकडं
भाऊनां गावफडे मोतीपवळांना पडं।''

ह्या आनी आनखी अशाच गंजनच ओव्या अहिराणीमां शेतीस. आठे सगळास्नाच आस्वाद कशा घेता यी?

# बाप्या

किरण दशमुखे

खूप दिवसपशीन मी गावकडे वनू व्हतु. गाव मझारतून चक्कर मारता मारता सहज भिलाटीकडे भी गऊ. आणि माले याद जयी बाप्यानी. बाप्या हाउ भिलना पोऱ्या. मना शाळकरी दोस्त. त्यानी याद येता बरोबर माले त्याले भेटानी खंत लागी. तवळ भील समाजना तो तवढा एकच पोऱ्या आमनी शाळमा व्हता. त्यामुळे सर्वाजण त्यानं कौतुक करेत. मास्तरंभी त्याना संगे प्रेमळपण खाल वागेत. पन काय जयं कानजो एवढं ऱ्हाईसन हाऊ बाप्या शाळमा नित्यनेम कव्हळच येत नव्हता. कायम त्यानी शाळले दांडीच राहे. बराच दाव मास्तर आमले चार पाच पोऱ्यास्ले बाप्याले शाळात बलावा कर्ता धाडेत आणि आमी बी आमना बळ खाल बाप्याले उचलीसन, वढीतानी शाळात घी येऊत. बाप्या शाळ पावत रडे. गंज नाटकं करे. शाळा वनी का मंग उगामुगा ऱ्हाये पन आणखी दुसरा दिवस वना का तिसरा दिवस गायब व्हये तशा बाप्या बुध्दीनी चांगला व्हता. पन त्यानं मन वह्या पुस्तकस्मा काही रमेचना आते पावत तो आशाच वढीतानी शिकत वना व्हता. त्याना माय बापनी भयान इच्छा, पोऱ्यानी खूप शिकवं अशी. पन बाप्याले मात्र घरन्या बकऱ्या घेईसन रानात जावालेच आवडे सोबत शिदोरी आणि पावा घेवाना. हाऊ पावा त्यानी सोताच येळूना लाकूडना बनाडा व्हता. सुट्टींना दिवस मालेभी जंगलात जावाले भयाण आवडे. मी बाप्या बरोबर जंगलात जाउ. बाप्याले जंगलनी भयान माहिती. त्याले जशे काही आपण जंगलना राजाच शेतंस अशी मस्ती वाटे. माले कव्हळ कव्हळ बाप्यानी हाई वृत्ती आवडे आणि त्याना हेवा भी वाटे. पण घरमा शिक्षणना वारसा असल्यामुळे मनं शिक्षणकडे काही दुर्लक्ष जयं नही. बाप्याले मात्र निसर्गच मोठा गुरु वाटे. त्यानीच कलाकृती तो पाहत ऱ्हाये. रानात बकऱ्या घी वना म्हणजे तो सगळं जग ईसरी जाये. डोंगरना पायथाले, एखांदा झरा ना काठले बासरी वाजत बसे. बासरी भयंकर मस्त वाजे, आशे वाटे का सर्वा निसर्गच त्यानं संगीत ऐकी राह्यना. पण एवढं जरी जये तरी त्यानी काळ परमाने बदलाले पाह्यजे, अशी आमनी अपेक्षा व्हती. पण तो मात्र स्वच्छंदी मनना. त्यानी सहाव्यात व्हता तव्हळच साळा सोडी दिधी. त्याले मी शाळा सोडानं खरं खुरं कारण इचारं. बाप्यानी हाई कारण कोणलेच सांगेल नव्हतं. मना जवळ मात्र तो त्यानं मनातलं बोलना. तो म्हणे, ''अरे दादा, मी भिलना पोऱ्या एक आदिवासीना पोऱ्या म्हनीसन सगळा म्हनाकडे पाहतंस. तशातच मन्ही नादारी. तुमले कशा स्वच्छ धुयेल चांगला कपडा ऱ्हातस. मना कपडा कशा तरी फाटका मळका. माले लाज वाटंस. याना मुळे मंग मी शाळाच सोडी दिधी.'' आणि तव्हळ पशीन बाप्यानी नी मनी भेटच व्हयनी नही.

त्याना तपासात माले एक गोट माहीत जयी. बाप्यानी म्हने काय उपाद कयी. त्यास्नाच जात मझारली एक पोरवर त्यानं प्रेम बसनं. आणि तिले दिवस गयात. मंग हाई केस जात पंचायत समोर वनी. त्यास्नी दोनीस्नं

लगन लाई दिधं. लगननंतर मात्र प्रेमनी धुंदी उतरी जास. संसार करता बाप्याना कष्ट सुरू जयात. गावातच एक पाटीलकडे त्यानी साल धरं. शेवट त्यानी परंपराच सांभाळी. काय म्हणवा या परंपरा ले ? परंपरा काय ऱ्हास ? अशा इचार मना मनात संताप आनेत. अशातच बाप्यानं घर गऊ. मोठा प्रेम खाल त्यानी मनं स्वागत कयं. झोपडी मझार बसाले पोतडं टाकं. नेटकेच वावरले पाणी लायेल व्हतं. एक बान्हं बदलीसन तो निश्चिंत मना शेजार बसना. आमन्या गप्पा रंगन्यात. तिकडे त्यानी बायको चुलावर चहानं बोगनं ठिसन चुलं फुकत व्हती. बाप्याना दोन गोष्टीसनी माले याद जयी. बाप्या चित्र भयंकर भारी काढे. तो नक्कीच एक चांगला चित्रकार बनता. दुसरी गोष्ट म्हणजे तो बासरी भयान भारी वाजे. मी त्याले बासरी वाजी दखाडानी इच्छा कयी. तव्हळ आंगणमा खेळणारं लहान पोऱ्यं रडत वनं. त्याले घेत बाप्या बोलना, 'खरं सांगू मित्रा, आते मना बासरीतला सूरच सरी गयात. आते आते फक्त वठंसवरी शीळ वाजंस. ती भी जनावरंससाठी. आते सूर उरणात त्या फक्त संसारना. रडणारा पोऱ्याकडे पाही तो बोलना. त्याना तो उदासेल चहेरा डोळासमोर साठवत मी त्याना निरोप घीसन निंघनू. येस ऽ रे ऽ बाप्या ऽ असे मी म्हणताच सगळा संसारनं दुःख ईसरीसन जरा येळ बाप्या शाळकरी वयमा गया आसे त्याना नजर मझारतून माले जाणवनं.

•

# 'लोकसमजूत' मजारला 'तिनशे साठ' : येक संकेत

डॉ. सुधीर रा. देवरे

वणी नांदुरीना गडवरली सप्तशृंगी देवीवर आमना गावमजारला लोक डफवर येक लोकगीत म्हनतंस. त्यावातला काही भाग आशा :

''वणी दिंडोरी
गायमुखलानी
तल्लोडीनं पानी,
तल्लोडीनं पानी वं माय
तल्लोडीनं पानी.....''

''तिनशे साठ पायऱ्या
चढीच गयी नीट
चढीच गयी नीट वं माय
चढीच गयी नीट.....''

ह्या गानामा गडन्या पायऱ्या 'तिनशे साठ' शेतीस आशा टहाळबन उल्लेख शे.

हायी येक अहिराणी भाशामातलं लोकगीत शे. लोकगीतंस्ना ज्या वैशिष्टे ऱ्हातंस त्या यावात शेतंस. जोरकस भाशा, रांगडा ढंग, पहाडी आवाज, आवर्ती लय आनि श्रध्दा यामजारतून हायी लोकगीत वाकृतत्वनुसार स्पंदन पावत ऱ्हास.

जधळ मी उलसा व्हतू आनि देवीना गडवर जायेल नव्हतू, तधळ देवीना गडबद्दल जे खूप आयकाले मिळे, त्यामुळे मी अवाक व्हयी जाऊ. गडनी उंची, गडवर चढानं येळे मजार जो रडतोंडीना घाट शे, तठे मानोस चढता चढता खरंच रडीच देस. मंग पुढे आखो खूप चढन का तधळ सपाटी लागस. सपाटीवर येक आक्खं गाव बशेल शे. तठे 'चितकडा' शे. चितकडा वर नवस बोलीसन कोनी तठोंग खाल दरिमा उडी मारस ते कोनी बैलगाडी खाल सोडस तरी त्या जित्ता ऱ्हातंस आशे आयकीसन मी चाट पडी जाऊ. तठली जत्रा, अंगात वारं घेणाऱ्या बाया आनि या सपाटी वरतीनबी वर 'तिनशे साठ' पायऱ्या चढी गयं का मंग सप्तश्रृंगी देवीनं देऊळ ! आशे जाई येनारा सांगेत, मी तवपावत गडवर जायेल नव्हतू.

जधळ मी गडवर पहिली खेपले गऊ, तधळ गडनी ती उची तो आंडदाडपना माले दिसना. चढ चढाना-रडतोंडयाना घाटना अनुभव सवता धिदा. तैन सपाटीपावत गाडी जाये ना. आनि आत्येना वाक-वळनस्ना गाडीकर्ता रस्ताबी तयार व्हयेल नव्हता....

सपाटीपावत चढी येतायेताच मी दमी गऊ. सपाटीवर जरासा दम घीसन 'तिनशे साठ' पायऱ्या चढाले लागनू. चढता चढता पहिली पायरीपशी मी पायऱ्या मोजत गऊ. मजार मजार दम खात शेवटपावत पायऱ्या वऱ्यात चारशे चौऱ्यात्तर.

देवीना गडन्या पायऱ्या ४७४ अशीसन लोक '३६०' का बरं म्हनतंस हाऊ प्रश्न माले तठेच सताडाले लागना. गीतमा नहीथे तोंडी सांगामा नक्की आकडाना उल्लेख नसना तरी साधारनखाल 'पावने पाचशे' आशा तरी उल्लेख पाहिजे व्हता. हाऊ प्रश्न मन्हा मनमा तशाच सांदीकोपरामा कैन्हना पडी रायेल व्हता.

काही वरीसनंतर मंग मी भिल आनि कोकनी समाजस्ना 'डोंगऱ्या देवना उत्सवस्ना' अभ्यास कराले लागू. ह्या उत्सवमाबी '३६०' हाऊ आकडा माले अधूनमधून दखावाले लागना. आयकाले मिळना. भिल आनि कोकनी लोकस्ना आशा समज शे, त्यास्ना डोंगऱ्या देवना गडस्नी संख्याबी 'तिनशे साठ' शे. जठे जठे ज्या ज्या डोंगरवर डोंगऱ्यादेवनं स्थान ऱ्हास त्या डोंगरले त्या गडच म्हनतंस. 'गड' ना भव्यपना ह्या डोंगरस्ले ऱ्हात नही. तरीबी त्या गडच ऱ्हातंस. ह्या गडस्नाजवळ ज्या बाऱ्या ऱ्हातीस त्या सुध्दा येकते '३६०' नहीथे ' नऊ लाख' ऱ्हातीस, हायीबी मन्हा ध्यानात वनं.

मागे देवीना गडन्या पायरीस्ना ३६० हाऊ उल्लेख जो मन्हा मनमा सांदी कोपरामा पडेल व्हता, तो ह्यामुळे आखो उफाळी वना.

आखो लोकगीत, लोककथा स्ना अभ्यास करीसन - लोकसमजूती समजी घेवानी कोशीश कई ते यानी संगती लागयी आशे वाटाले लागं.

इचार करता करता लोकसमजूतीस्मा '३६०' आकडाना गतच 'नऊलाख', 'छपन्न', 'सवा मन', 'सतराशे साठ' आशा आकडा मिळाले लागात.

आठे माले ज्ञानेश्वरीनीबी आठवन जयी. ज्ञानेश्वरीमा ओवीनी योजनामुळे सैन्यनी मोजदाद 'अपार' या शब्दवरी करेल शे. तधळ आठे 'अपार' म्हनजे खूप आशा अर्थ घेना पडयी. तसेच ज्ञानदेव यास्नी छप्पन भाषास्ना गौरव करेल शे, ज्ञानदेव यास्ले छपन्न भाशा इयेत. आशा उल्लेख संत नामदेव करतंस, म्हनजे काय ? छप्पन्न भाशा म्हनजे कोनकोनत्या भाशा ? आशा प्रश्न कोनी विचारयी. पन नीट इचार कया ते 'छप्पन' म्हनजे अनेक भाशा, खूप भाशा आशा अर्थ आठे लावना पडंस. कारन हाऊ लोकसमजूतमजारला 'आकडा' शे. संख्याशास्त्रमजारला नही.

म्हनूनच लोकसाहित्यमजार अनंतता, खूप, भव्यता, दिव्यता ह्या गोष्टी मनवर नीट ठसाडाकर्ता 'तिनशे साठ', 'नऊ लाख', 'सव्वा लाख' आशा परकारना सामान्यनाम ना गत 'आकडा' वापरतंस आशे ध्यानात वनं. उदाहरनार्थ म्हनीसन आपली 'झाकेल मूठ' जशी कायम 'सवा लाखनी' ऱ्हास, तशाच कोनताबी गडन्या पायऱ्या ३६० ऱ्हातीस आनि बाऱ्या 'नऊ लाख' ऱ्हातीस.

थोडकामा, अध्यात्मिक आनि लोकसमजमजारली मोजदाद अंकगनितवरी व्हत नही ते ती कोनताबी भाबडा ग्रामीन मानुसले सहज कळयी आशा 'तिनशे साठ' हया चिन्हाना गत शब्दस्वरी व्हताना दखास. म्हणून 'तिनशे साठ' हाऊ शब्द आकडा नही ते 'खूप' ह्या अर्थना तो येक संकेत शे.

●

आदिवासी बोलीमध्ये ढोल हे नियतकालिक भाषा केंद्राद्वारे प्रकाशित केले जाते. अहिराणी, पावरी, देहवाली, राठवी, कुंकणा डांगी, डुंगरी भिली, पंचमहाली भिली, भांतु, चौधरी, गोर बंजारा अशा एकूण दहा बोलींमध्ये ढोल प्रसिद्ध करण्यात येते, तसेच मराठीतही संकलित स्वरूपात ढोल प्रसिद्ध करण्यात येते; आणि त्याचा व्याप अजून वाढविण्याचा आमचा प्रयत्न राहील. ढोलच्या अहिराणी आवृत्तीचे संपादक डॉ. सुधीर देवरे हे कला, लोकजीवन आणि लोकवाङ्मय यांचे अभ्यासक असून त्यांचा 'डंख व्यालेलं अवकाश' नावाचा मराठी कवितासंग्रह तसेच 'आदिम तालनं संगीत' नावाचा अहिराणी कवितासंग्रह प्रकाशित झालेला आहे.



प्रकाशक
भाषा संशोधन-प्रकाशन केंद्र

मुद्रक
आकार ऑफसेट, दांडिया बाजार, वडोदरा

ISSN : 0971 9156... 97